बक्षीस देण्यास व लायब्ऱ्यांकरितां घेण्यास
मंजूर केलेला ग्रंथ.

# गलिव्हर याचा वृत्तांत.

## भाग तिसरा.

## लापुटा वगैरे देशांची सफर.



हा ग्रंथ

स्विफ्टकृत 'गलिव्हर्स ट्राव्हल्स' या इंग्रजी ग्रंथावरून

हरि कृष्ण दामले

यांनीं लिहिला.

चित्रयुक्त आवृत्ति तिसरी.

सन १९११.

किंमत ५ आणे.

हा ग्रंथ

पुणें येथें **इंदिरा** छापखान्यांत **त्र्यंबक हरि आवटे** यांनीं छापिला, व **हरि कृष्ण दामले** यांनीं पुणें पेठ शनवार येथें प्रसिद्ध केला.

---

# तिन्ही आवृत्तींची प्रस्तावना.

ऐर्लंड देशांत स्विफ्ट् नामेंकरून एक मोठा विख्यात ग्रंथकार गेल्या शतकांत होऊन गेला. त्याचा अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ ' गलिव्हर्स ट्राव्हल्स् ' हा होय. या ग्रंथाचे एकंदर चार भाग आहेत. त्यांपैकीं तिसऱ्या भागाचें हें भाषांतर मराठी वाचकांकरितां तयार केलें आहे.

सदरील ग्रंथाचा मुख्य उद्देश मनोरंजन हा तर आहेच; पण मूळ ग्रंथकाराचा उद्देश याहूनही खोल होता. तो हा कीं, त्या वेळेस जीं राजकारस्थानें चालत असत, जें मंत्रिमंडळ होतें, जे विख्यात शोधक होते, आणि एकंदर जी लोकस्थिति होती, त्यांविषयीं उपरोधोक्तीनें लिहून त्यांचा उपहास करावा. हा त्याचा गुप्त हेतु त्या वेळेसही सामान्य वाचकांस प्रथमतः कळून आला नाहीं; व हल्लीं तर त्या [illegible] समोरें दीडशें वर्षांहून अधिक काळ लोटून गेल्या[illegible] त्या[illegible] उपरोधोक्तीचा रोख स्पष्टपणें ध्यानांत येण्यास फारसा मार्गही उरला नाहीं. तरी ग्रंथकारानें आपल्या पात्रांच्या तोंडून जे अभिप्राय वदवले आहेत, व त्याचे स्वतःचे जे उद्गार ठिकाठिकाणीं निघालेले आहेत, त्यांवरून मार्मिक वाचकांस सदरील प्रकार जागोजाग आढळल्यावांचून राहणार नाहीं.

हें भाषांतर केवळ शब्दशः केलें नसून मराठी भाषेला जसें गोड दिसेल तसें उतरलेलें आहे. कांहीं ठिकाणीं थो-

हेबहुत फेरफारही करावे लागले आहेत. तेव्हां एकंदरीनें पाहतां हा ग्रंथ सामान्य वाचकांस व इंग्रजी शिकणारांसही उपयोगीं पडेल असा आहे.

या ग्रंथाची दुसरी आवृत्ति चित्रें घालून छापिली होती, तशीच हीही छापिली आहे. मे० डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन साहेब बहादूर यांनीं हा ग्रंथ शाळांतून बक्षीस देण्यास व लायब्रऱ्यांकरितां घेण्यास मंजूर केला याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा अत्यंत आभारी आहे. त्याचप्रमाणें या ग्रंथास वऱ्हाड व नागपूर येथील विद्याखात्यांचे अधिकाऱ्यांकडून व कांहीं संस्थानिकांकडून आश्रय मिळाला, याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचाही फार आभारी आहे.

हरि कृष्ण दामले.

पुणें, ता० ७ आगष्ट १९११.



# गलिव्हर याचा वृत्तांत.

## भाग तिसरा.

## लापुटा वगैरे देशांची सफर.

### प्रकरण १.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें मला घरीं येऊन दहा दिवस झाले नाहींत तोंच विल्यम् रॉबिन्सन् या नांवाचा एक गृहस्थ मजकडे आला. हा कॉर्न्वॉल् प्रांताचा राहिवासी असून होप्वेल् नांवाच्या एका मोठ्या जहाजाचा कप्तान होता. कांहीं वर्षांपूर्वी आह्मी भूमध्य समुद्राची सफर करीत असतां मी एका जहाजावर शस्त्रवैद्य होतों, व सदर्हू गृहस्थ त्या जहाजाचा कप्तान असून त्यापैकीं एक चतुर्थांश भागाचा मालकही होता. त्या वेळीं जरी तो माझा वरिष्ठ अधिकारी होता, तरी त्याचा माझा तशा प्रकारचा संबंध मुळींच नसून मला तो केवळ आपल्या भावाप्रमाणें मानीत असे. मी आलों हें ऐकून तो मला भेटण्याकरितां आला. तो केवळ पूर्वीच्या उभयतांच्या स्नेहसंबंधास्तवच मला भेटावयास आला असें मला वाटलें; कारण बहुत दिवस वियोग झाला असतां मित्रांमध्यें ज्या प्रकारच्या गोष्टी निघावयाच्या तशा गोष्टींखेरीज दुसरें कांहींएक आमच्या भाषणामध्यें आलें नाहीं. असो; नंतर तो मजकडे वारंवार येऊं लागला, व मी सुखरूप येऊन पोहोंचलों याविषयीं त्यानें आनंद

दर्शवून, आतां तुह्मी पुढें आपला आयुष्यक्रम कोणत्या रीतीनें चालविणार, याविषयीं त्यानें विचारपूस केली; व आपला बेत आणखी दोन महिन्यांनंतर ईस्टइंडीजकडे जाण्याचा आहे असेंही सांगितलें; आणि सरतेशेवटीं त्यानें उघडपणें पण किंचित् संकोचपूर्वक मला आपला उद्देश कळविला. तो ह्मणाला, 'तुह्मी मजबरोबर चला; तुमचेकडे शस्त्रवैद्याचें काम देण्यांत येईल व तुमचे हाताखालीं आणखी एक शस्त्रवैद्य असून खेरीज दोन मनुष्यें राहतील; व नेहमींपेक्षां तुह्मांस दुप्पट पगार मिळेल; आणि तुम्हांला नौकानयनसंबंधी माहिती निदान माझ्याइतकी तरी आहे याचा मला अनुभव आहे, यास्तव मी तुह्मांला जहाजाचे कप्तानच समजून हरएक गोष्टीमध्यें तुमची सल्लामसलत घेत जाईन याबद्दल तुमची पाहिजे तशी मी खात्री करितों.'

वरील गोष्टीच्या संबंधानें त्या गृहस्थानें मला आणखीही पुष्कळ प्रकारें गळ घातली; व त्याच्या प्रामाणिकपणाविषयीं माझी खात्री असल्याकारणानें मला त्याचा शब्द मोडवेना. खेरीज मला जरी पूर्वी बहुत संकटें भोगावीं लागलीं होतीं, तरी माझी देशाटनाविषयीं पूर्वींपासून जी उत्कट इच्छा होती ती तिळमात्रही कमी झाली नव्हती. आतां या गोष्टीस माझ्या बायकोचें अनुमत कसें मिळतें हीच काय ती अडचण राहिली. पण शेवटीं तिनेंही आपल्या मुलांच्या कल्याणाकडे लक्ष देऊन मला आपला रुकार दिला.

आह्मीं इसवी सन १७०६ चे आगष्ट महिन्याचे पांचवे तारखेस निघालों, व १७०७ च्या एप्रिलच्या अकरावे तारखेस फोर्ट सेंट जॉर्ज ( मद्रास ) येथें येऊन दाखल झालों. आमचे कांहीं खलाशी लोक आजारी असल्याकारणानें त्यांस आराम पडण्याकरितां या ठिकाणीं आह्मीं तीनवार-

पावेतों मुक्काम केला. तेथून आह्मी टॉङ्क्किन् येथें गेलों. या ठिकाणीं आमच्या कप्तानाचा कांहीं दिवस रहाण्याचा बेत झाला. कारण त्यास जो माल खरेदी करावयाचा होता तो बहुतेक तयार नसून मागाहूनही तो बरेच दिवसपर्यंत येईल असा संभव नव्हता. ह्मणून आपला आजपर्यंत झालेला खर्च थोडाबहुत निघावा या हेतूनें त्यानें एक लहानसें जहाज विकत घेतलें; आणि टॉङ्क्किनूचे लोक नेहमीं जवळपासच्या बेटांत व्यापाराकरितां जे जिन्नस नेतात, त्यांपैकीं कितीएक प्रकारचे जिन्नस त्यानें या जहाजांत भरले. सदरील जहाजावर त्यानें चवदा असामींची नेमणूक केली. त्यांपैकीं तीन असामी तेथलेच रहिवासी होते. त्यानें मला या जहाजाचा कप्तान नेमिलें, आणि मला व्यापार करण्याची मुखत्यारी देऊन आपण टॉङ्क्किन् येथें आपल्या कामाची व्यवस्था पाहण्यास राहिला.

आम्ही निघाल्यापासून तीन दिवस झाले नाहींत तोंच एक मोठें तुफान झालें, आणि पांच दिवसपर्यंत, प्रथम ईशान्येकडे आणि नंतर पूर्वेकडे आमचें गलबत वहात गेलें. त्यानंतर आम्हांस चांगला वारा लागला; तथापि पश्चिमेकडून मधून मधून वाऱ्याचा बराच मोठा सोसाटा येत असे. दहावे दिवशीं आमचे मागें चांचे लोकांचीं दोन गलबतें लागलीं, व त्यांनीं आम्हांस लवकरच गांठलें; कारण आमचे जहाजांत रगडून माल भरलेला होता यामुळें तें फारच मंद गतीनें चाललें होतें; तशांत स्वसंरक्षणाचें कोणतेंही साधन आम्हांपाशीं नव्हतें.

वर सांगितलेल्या चांचे लोकांच्या दोन्ही जहाजांचे नाईक आमचे गलबतावर एकदम चढून आले; आणि त्यांनीं आपले लोकांनिशीं मोठ्या आवेशानें आमच्यावर हल्ला केला.

परंतु आम्हीं सर्वांनीं त्यांजपुढें साष्टांग नमस्कार घातले. ( कारण याप्रमाणें करण्यास मीं आपल्या लोकांस ताकीद दिली. ) हें पाहून त्यांनीं चऱ्हाटांनीं आमच्या मुसक्या बांधिल्या, आणि आम्हांवर पहारा ठेवून आपण जहाजांतील जिन्नस धुंडाळूं लागले.

त्या लोकांमध्यें एक डच मनुष्य होता. तो त्यांपैकीं कोणत्याही जहाजाचा कप्तान नव्हता, तथापि हा कोणी तरी अधिकारी असावा असें मला वाटलें. आमच्या तोंडवळ्यावरून आम्हीं इंग्लिश लोक आहों हें त्यानें ओळखिलें; आणि ‘ यांच्या पाठीशीं पाठी बांधून यांस समुद्रांत लोटून द्यावें ’ असें तो आपले भाषेंत बडबडला. मलाही डच भाषा बरीच अवगत होती. तेव्हां आम्ही कोण, कोठील वगैरे सर्व मीं त्यास सांगितलें; आणि विनंति केली कीं, ‘ महाराज, आम्ही ख्रिस्ती असून प्रॉटेस्टंट आहों, आपले उभयतांचे देश एकमेकांच्या अगदीं लगत असून उभय देशांमध्यें पूर्ण ऐक्यभाव आहे; तर ह्या सर्व गोष्टी लक्षांत आणून आह्मांवर दया करण्याविषयीं कप्तानसहेबांस आपण चार गोष्टी सांगाव्या. ’ हें ऐकतांच त्याच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला; आणि त्यानें वर सांगितल्याप्रमाणें आमची दुर्दशा करण्याविषयीं पुनः पुनः आम्हांस भीति घातली, व आपल्या मंडळीकडे वळून मोठ्या आवेशानें बोलूं लागला. हें तो बहुतकरून जपानी भाषेंत बोलला असावा असें मला वाटलें; कारण ‘ ख्रिस्तिआनस ’ हा शब्द त्याच्या बोलण्यांत पुष्कळ वेळां आला.

ह्या चांचे लोकांच्या जहाजांपैकीं थोरलें जें जहाज होतें, त्याचा कप्तान एक जपानी मनुष्य होता. त्याला डच भाषेचा किंचित् संस्कार होता. तो मजकडे आला आणि

त्यानें मला कित्येक सवाल केले. त्यांचीं उत्तरें मीं फार लीनतेनें दिलीं. त्यावरून शेवटीं तो म्हणाला, ‘ आम्ही तुम्हांस जीवदान देऊं. ’ तेव्हां मीं त्यास लवून सलाम केला, आणि पूर्वी सांगितलेल्या डच मनुष्याकडे वळून त्यास म्हटलें, ‘ अहो, हा गृहस्थ मूर्तिपूजक ( खोट्या धर्माचा ) असून ह्याचे ठायीं किती भूतदया आहे बरें ! आणि तुम्ही प्रत्यक्ष माझे धर्मबंधु असून तुमचे ठायीं तर ती मुळींच दिसून येत नाहीं हें पाहून मला फार वाईट वाटतें ! ’ परंतु माझा हा शहाणपणा मला चांगला फळास आला ! कारण त्या दुष्ट खुनशी मनुष्यानें मला समुद्रांत ढकलून देण्याविषयीं दोन्ही जहाजांच्या कप्तानांचें मन वळविण्यासाठीं आपली पराकाष्ठा करून सोडिली! परंतु त्याचा हा यत्न सिद्धीस गेला नाहीं. कारण ते कप्तान म्हणाले, ‘ आम्हीं यास अभयवचन देऊन चुकलों आहों, तेव्हां आतां आम्हांला तुमचें म्हणणें कबूल करवत नाहीं. ’ तथापि त्याच्या खटपटीनें इतकें झालें कीं, त्यांनीं मला फारच भयंकर शिक्षा दिली---कीं जी प्रत्यक्ष मृत्यूलाही बरा म्हणाविणारी होती असें कोणासही वाटल्यावांचून रहाणार नाहीं ! आमचे लोक निम्मे निम्मे त्यांनीं आपल्या एकेका जहाजांत भरले, व आमच्या जहाजांत दुसरे लोक भरले; आणि मला एका लहानशा होडींत घालून व दोन हातवल्हीं व एक अवजार आणि चार दिवसांची अन्नसामुग्री देऊन समुद्रांत सोडून देण्याचा त्यांनीं ठराव केला. परंतु त्या जपानी कप्तानाला माझी दया येऊन त्यानें आपल्या पदरची आणखी चार दिवसांची सामुग्री मला दिली, आणि याची होडी धरण्यास कोणींही तिच्या मागें लागूं नये अशी त्यानें आपल्या लोकांस सक्त ताकीत दिली. असो; याप्रमाणें

मी होडींत जाऊन बसलों असतां त्या डच मनुष्यानें गलबतावरून नाहीं नाहीं तसले शाप व शिव्या यांचा केवळ मजवर वर्षावच केला; तो इतका कीं, मला वाटतें, याउपर त्यांच्या भाषेंत तसले शब्द मुळींच उरले नसतील !

हीं वर सांगितलेलीं चांचे लोकांचीं जहाजें आमच्या दृष्टीस पडण्यापूर्वीं सुमारें एक तास मीं वेध घेऊन पाहिलें तेव्हां मला असें आढळून आलें होतें कीं, आह्मी उत्तर अक्षांश ४६ व १८० रेखांश या सुमारास आहों. सदरील जहाजांपासून आम्ही कांहीं अंतरावर असतां मीं दुर्बिणींतून पाहिलें तेव्हां आग्नेयीकडे कांहीं बेटें माझ्या दृष्टीस पडलीं होतीं. असो; मग मीं आपल्या होडीचें शीड उभारलें, व त्या वेळेस वाराही अनुकूळ होता, सबब सदरील बेटांपैकीं नजीकच्या बेटास जाऊन लागण्याचा मीं बेत केला, आणि सुमारें तीन तासांत तेथें जाऊन पोहोंचलों. हा सर्व प्रदेश खडकाळ होता; तथापि तेथें मला पक्ष्यांचीं पुष्कळ अंडीं सांपडलीं. मीं चकमक झाडून थोडेंसें गवत वगैरे पेटवून त्यात तीं अंडीं भाजलीं. याखेरीज मीं दुसरें कांहीं खाल्लें नाहीं; कारण आपली सामुग्री होईल तितकी शिलक ठेवावी असा मीं बेत केला. रात्रीं मी एका कड्याच्या आसऱ्यास थोडेंसें गवत पसरून त्यावर पडलों, व मला बरीच झोंप लागली.

दुसरे दिवशीं मी दुसऱ्या बेटाला गेलों; व तेथून तिसऱ्याला व नंतर चवथ्याला गेलों. ह्या वेळीं मीं आपली होडी कांहीं शिडांचे योगानें व कांहीं हातवल्ह्यांचे योगानें चालवून कसें तरी काम पार पाडलें. आतां मला जीं दुःखें सोसावीं लागलीं त्यांची सविस्तर हकीकत सांगूं लागलों तर वाचकांस कंटाळा येईल; तर येथें इतकेंच सांगणें बस आहे कीं, मी होडी

हांकारल्यापासून पांचवे दिवशीं शेवटचे बेटास जाऊन पोहोंचलों. हें बेट पूर्वींच्या बेटाच्या आग्नेयीस होतें.

मला वाटलें होतें त्यापेक्षां हें बेट बरेंच दूर होतें, त्यामुळें तेथें पोहोंचण्यास मला पुरे पांच तास लागले. उतरण्यास सोईची जागा पाहण्यासाठीं त्या बेटास बहुतेक प्रदक्षिणाच मला घालावी लागली; तेव्हां शेवटीं एक लहानशी खाडी मला आढळली. तिची रुंदी सुमारें माझ्या होडीच्या रुंदीच्या तिप्पट होती. हें बेट सर्व पाषाणमय होतें. कोठें कोठें मात्र थोडें थोडें गवत व सुवासिक फुलांचीं झाडें होतीं. मजपाशीं जे कांहीं खाण्याचे पदार्थ होते ते मीं बाहेर काढिले, आणि थोडासा फराळ केला; तेव्हां मला अंमळ बरें वाटलें. मग बाकीची सामुग्री एका गुहेंत सुरक्षित ठेवून दिली. मीं खडकांतून पुष्कळ अंडीं शोधून आणिलीं, आणि वाळलेलें गवत वगैरे बरेंच जमा करून ठेविलें; व दुसरे दिवशीं तें पेटवून त्यांत तीं अंडीं भाजून काढण्याचा बेत केला. ( मजजवळ गारगोटी, लोखंड, सनकाडी वगैरे विस्तव तयार करण्याचें सर्व सामान होतेंच.) मीं ज्या गुहेंत आपलें सामान [illegible]लें होतें, त्या ठिकाणींच पडून ती सर्व रात्र काढिली. मीं गवत वगैरे जें सर्पणाकरितां जमविलें होतें, तेंच मला रात्रीं अंथरावयास उपयोगीं पडलें. माझा त्या सगळ्या रात्रींत डोळा ह्मणून कसा तो लागलाच नाहीं; कारण माझ्या मनाच्या अस्थिरतेपुढें माझे श्रम मला कळून आले नाहींत, आणि मी एकसारखा विचार करीत राहिलों. आतां आपला जीव अशा ह्या निर्जन प्रदेशांत वांचणें किती कठिण आहे, व आपला शेवट तरी किती दुःखकारक होणार, याविषयींचे विचार एकसारखे माझ्या मनांत घोळूं लागले;

तथापि निराशेमुळें मला इतकी मरगळ आली होती कीं, मला पडल्या जाग्यावरून उठावेंसें देखील वाटेना. अशा स्थितींत बराच वेळ गेल्यावर मला किंचित् हुशारी आली; आणि मी उठून आपल्या गुहेच्या बाहेर येऊन पहातों तों दिवस बराच आला होता. मी कांहीं वेळ त्या खडकांत इकडे तिकडे फिरलों. त्या वेळीं आकाश निरभ्र असून ऊन इतकें कडक पडलें होतें कीं, माझे डोळे देखील दिपूं लागले. इतक्यांत एकाएकीं असें झालें कीं, तो उन्हाचा सर्व चकचकाट नाहींसा होऊन किंचित् अंधारही पडल्यासारखें झालें; व आकाश ढगांनीं व्याप्त झालें असतां जो प्रकार घडतो त्याहूनही ही तऱ्हा मला फारच निराळी दिसून आली. मीं मागें वळून पाहिलें तों एक मोठा प्रचंड अपारदर्शक पदार्थ सूर्याच्या व माझ्या दरम्यान असून तो ह्या बेटाकडेच येत आहे असें दृष्टीस पडलें. त्याच्या योगानें सूर्य सात आठ मिनिटें दिसेनासा झाला होता; परंतु यामुळें उष्णतेंतील प्रखरता किंचितूही कमी झाली नाहीं, व विशेष अंधारही पडला नाहीं; तर फक्त डोंगर वगैरेंच्या आड मनुष्य असलें म्हणजे जसें त्यास वाटतें त्यासारखाच प्रस्तुत प्रकार मला भासला. मी ज्या ठिकाणीं उभा होतों, तिकडे तो पदार्थ जसजसा येत चालला तसतसा त्याचा आकार वगैरे मला दिसूं लागला. तो पदार्थ भरींव असून त्याची खालची बाजू सपाट व गुळगुळीत होती, व समुद्रावर पडलेल्या सूर्यकिरणांचें परावर्तन तिजवर होऊन ती फारच लकाकत होती. मी समुद्रकिनाऱ्यापासून सुमारें पांचशें हातांवर होतों, व तेथून अजमासें पाव कोसाच्या अंतरावर सदहू पदार्थ नीट खालीं येत आहे असें माझ्या दृष्टीस पडलें. मीं आपली दुर्बीण कप्यांतून काढिली, आणि

पहातों तों पुष्कळ लोक त्या पदार्थाच्या बाजूबाजूनें फिरतांना माझ्या दृष्टीस पडले. सदर्हू बाजू उतरत्या असाव्या असें मला दिसलें. परंतु ते लोक काय करीत होते हें चांगलेंसें दिसलें नाहीं.

प्रत्येक मनुष्याला स्वतःचा जीव हा अतिशय प्यारा असतो, व त्याप्रमाणें माझीही स्थिति असणें साहजिकच होतें हें सांगावयास नकोच. तेव्हां वरील गोष्टीवरून माझ्या मनाला किंचित् आल्हाद वाटला, आणि अशी आशा उत्पन्न झाली कीं, हा जो कांहीं प्रकार दिसत आहे, त्याच्याच योगानें ह्या निर्जन प्रदेशांतून व ह्या एकंदर दुःखदायक स्थितींतून आपण कसे तरी पार पडूं. असो; परंतु त्या वेळेस माझ्या मनाला जें कांहीं आश्चर्य वाटलें, त्याची वाचकांस कल्पनाही होणें अशक्य आहे; कां कीं, तो सर्व प्रकार तसाच कांहीं विलक्षण होता. अगोदर तें बेट मुळींच अधांतरीं असून त्यावर मनुष्यांचीही वस्ती होती; व तें वर नेणें, खालीं आणणें, किंवा वाटेल त्या दिशेस चालविणें, हें त्यांच्या केवळ हातचें होतें. ( हें पुढील हकीकतीवरून लक्षांत येईल. ) परंतु, या अद्भुत चमत्काराचें तत्त्व काय आहे याचा विचार कांहीं वेळ एकीकडे ठेवून, सध्या हें बेट स्थिर आहे, तर हें आतां कोणीकडे जातें, ह्या गोष्टीचा विचार करणें मला बरें वाटलें.

इतक्यांत सदर्हू बेट माझ्या अगदीं नजीक आलें. त्याजवर सभोंवतीं एकावर एक मोठाले ओटे असून एका ओटयावरून दुसऱ्या ओटयावर जाण्याकरितां मधून शिड्या लाविलेल्या होत्या. कांहीं लोक अगदीं खालच्या ओट्यावर बसून मोठमोठ्या गळांनीं मासे धरीत होते, व कांहीं उगीच त्यांच्याकडे बघत बसले होते. मी येथें असल्याविषयीं त्या

बेटावरील लोकांस कळावें म्हणून मी आपली टोपी व हातरुमाल त्यांच्याकडे पाहून हालवूं लागलों; व ते जेव्हां



"बेट माझ्या अगदीं नजीक आलें." ( पृ ९. )

पूर्वीपेक्षांही जवळ आले तेव्हां मीं त्यांस मोठमोठ्यानें ओरडून हांका मारिल्या; आणि जेव्हां मी चोहोंकडे लक्षपूर्वक पाहूं लागलों, तेव्हां माझ्या अगदीं समोर जी बेटाची बाजू होती तिच्यावर लोकांची गर्दी झालेली माझ्या दृष्टीस पडली. मीं त्यांस ज्या हांका मारिल्या, त्यांस त्यांनीं उत्तर दिलें नाहीं; तथापि माझ्याकडे बोटें दाखवून ते आपापल्यांत बोलत होते, यावरून त्यांनीं मला पाहिलें असावें असें मला खास वाटलें. इतक्यांत चारपांच मनुष्यें मोठ्या त्वरेनें

शिड्यांवरून बेटाच्या वरच्या भागाकडे गेलीं, व लागलींच दिसतनाशीं झालीं. तेव्हां याच्या (माझ्या) संबंधानें काय तजवीज करावी याविषयीं हुकूम आणण्याकरितां ते लोक कोणा अधिकाऱ्याकडे गेले असावे, असा मीं अजमास केला, व तो बरोबरही होता.

इतक्यांत लोकांची फारच गर्दी झाली, आणि सुमारें अर्ध्या तासाचे आंत तें बेट वर जाऊं लागलें; व मी ज्या उंचवट्यावर उभा होतों तेथून सुमारें दोनशें हातांच्या अंतरावर माझ्या अगदीं समोर येऊन तें थडकलें. तेव्हां मी त्या लोकांना हात जोडून मोठ्या लीनतेनें कांहीं शब्द बोललों. पण मला उत्तर मुळींच मिळालें नाहीं. माझ्या अगदीं समोर जे लोक होते, ते कोणी बडे लोक असावे असें त्यांच्या पोषाखावरून मला वाटलें. ते मजकडे वारंवार पाहून मजविषयीं मोठ्या उत्सुकतेनें कांहीं बोलत होते. सरतेशेवटीं त्यांच्यापैकीं एकानें मोठ्या सभ्य रीतीनें मला हांक मारिली. त्याचें बोलणें मृदु व स्पष्ट असून त्याची ती भाषा मला इताली देशाच्या भाषेसारखी वाटली; आणि ह्मणून मीं त्यास त्या भाषेंत उत्तर दिलें. याचें कारण असें कीं, माझ्या बोलण्याचा अर्थ जरी त्यास समजला नाहीं, तरी निदान त्याला माझा स्वर तरी परिचित वाटावा. जरी आम्हां उभयतांस एकमेकांचें बोलणें समजलें नाहीं, तरी त्या लोकांना माझी दुःखप्रद स्थिति दिसत असल्यामुळें माझ्या मनांतील आशय त्यांना सहज कळून आला.

त्यांनीं मला त्या टेंकडीवरून खालीं उतरून किनाऱ्याकडे जाण्याविषयीं खुणेनें सांगितलें. त्याप्रमाणें मी गेलों, आणि तें उडतें बेट त्यांनीं बेताच्या उंचीवर आ-

णिल्यावर, जेव्हां त्याची कडा अगदीं माझ्या डोकीवर आली, तेव्हां त्यांनीं एका सांखळीला खुर्ची बांधून ती खालीं सोडिली. मग मी तिजवर बसलों, व त्यांनीं मला कप्यांच्या योगानें वरतीं ओढून घेतलें.

---

## प्रकरण २.

मी त्या बेटावर जेव्हां जाऊन उतरलों, तेव्हां माझ्या सभोंवतीं लोकांची खूब गर्दी जमली. त्यांत जे लोक माझ्या अगदीं जवळ उभे होते, ते साधारण बऱ्या प्रतीचे होते. मला पाहून त्यांस एकंदरीनें परम आश्चर्य वाटलेंसें दिसलें; व त्यांस पाहून मलाही कांहीं कमी आश्चर्य वाटलें असें नाहीं; कारण हा काळपर्यंत जे जे लोक माझ्या पहाण्यांत आले त्यांपेक्षां हे फारच निराळ्या तऱ्हेचे होते. त्यांच्या रीतीभातीं, त्यांची मुद्रा, आणि शरिराचा एकंदर सर्वच आकार कांहीं विलक्षण होता. त्यांचीं डोकीं आपल्यासारखीं उभीं नसून उजव्या किंवा डाव्या बाजूकडे वळलेलीं होतीं; त्यांचा एक डोळा अगदीं खोल गेलेला असून दुसरा थेट आकाशाकडे लागलेला आहे असें दिसे;* त्यांच्या अंगावरचीं वस्त्रें सूर्य, चंद्र, व इतर तारे यांच्या चित्रांनीं शृंगारिलेलीं असून मध्यें मध्यें सारंगी, पांवा, किनरी, करणा वगैरेंचींही चित्रें त्यांवर काढिलेलीं होतीं; याखेरीज आणखीही पुष्कळ वाद्यांचीं चित्रें होतीं; त्यांचीं नांवें देखील इकडे कोणास माहीत नसतील. तेथें कित्येक

---

* जे लोक मानसशास्त्रामध्यें व्यर्थ आपला वेळ घालवितात त्यांस उद्देशून ही वरील उपरोधोक्ति आहे असें दिसतें; कारण लापुटियन लोकांच्या डोळ्यांप्रमाणेंच या लोकांची मानसिक स्थिति केवळ वेडगळपणाची असते !

लोक हातांत काठ्या घेऊन फिरतांना मीं पाहिले. त्यांच्या पोषाखावरून ते नोकर असावेसें दिसलें. त्यांच्या काठ्यांच्या एकीकडच्या टोंकांस पिशव्या बांधिलेल्या असून त्या पिशव्यांमधून वाळलेले वाटाणे अथवा बारीक बारीक खडे भरलेले असत. ( ही गोष्ट मला मागाहून कळली. ) या लोकांजवळ जे लोक उभे होते त्यांच्या तोंडावर व कानावर ते ह्या वरील पिशव्या हळूच झटकीत. ही काय चमत्कारिक चाल असावी, ह्याविषयीं मला कांहींच कल्पना होईना. याचें कारण मला पुढें असें समजलें कीं, या लोकांचीं मनें मानसशास्त्रामध्यें इतकीं गढून गेलेलीं असतात कीं, त्यांच्या तोंडाला व कानाला वरून कांहीं उपचार केल्याविना त्यांना दुसऱ्याशीं बोलतां येत नाहीं, व दुसरा काय बोलतो हें ऐकतांही येत नाहीं. यास्तव ज्यांना ऐपत असते ते लोक वर सांगितल्या प्रकारचे नोकर घरीं बाळगितात, व कोठें बाहेर अगर कोणाच्या भेटीस जाणें झाल्यास त्या नोकरांस बरोबर घेतल्यावांचून जात नाहींत. या नोकरांचें काम म्हटलें म्हणजे दोन, तीन किंवा अधिक मनुष्यें एकत्र जमलीं असतां त्यांपैकीं जो कोणी बोलणारा असेल त्याच्या तोंडास, व ज्याशीं बोलावयाचें असेल त्याच्या उजव्या कानास, आपल्या पिशवीनें हळूच फटका द्यावयाचा हें आहे. ते लोक बाहेर फिरावयास गेले तरी देखील नेहमीं विचारांत इतके निमग्न झालेले असतात कीं, चालतांना ठेंच वगैरे लागून पडण्याची, अथवा मध्यें कांहीं खांब वगैरे आल्यास त्यावर डोकें आपटण्याची, अगर दुसरा कोणी मनुष्य समोरून येत असल्यास त्याची याची टक्कर होऊन उभयतांही गटार वगैरेंत पडण्याची भीति असते. तेव्हां अशा प्रसंगीं ह्या नोकरांचा तर त्यांस फारच उपयोग

होतो. कारण ते वेळोवेळीं आपल्या यजमानांच्या डोळ्यांवर मागें सांगितलेल्या पिशवीचा फटका देऊन त्यांना 'नजर रखो !' असें सुचवीत असतात.*

वरील प्रस्ताव करण्याचें कारण इतकेंच कीं, या लोकांच्या साधारण स्थितीचें वाचकांस थोडेंसें दिग्दर्शन व्हावें. नाहींपेक्षां पुढील हकीकतीवरून ते घोटाळ्यांत पडण्याचा संभव आहे; कां कीं, त्या लोकांनीं मला बेटावर नेलें व तेथून राजवाड्यांत नेलें, तेव्हां त्यांची ती एकंदर कृति पाहून मीही अगदीं बुचकळ्यांत पडून गेलों होतों. कारण जेव्हां आम्ही वर चढूं लागलों, तेव्हां कित्येक वेळां त्या लोकांस आपण काय करीत आहों याचें भान न राहून मजकडे मुळींच त्यांचें लक्ष नसे; व माझा चमत्कारिक पेहराव व मुद्रा पाहून, किंवा आसपासचे रिकामटेकडे तमासगीर लोक गलबला करीत त्याचे योगानें तरी, ते देहभानावर यावे, पण तसें न होतां चित्राप्रमाणें ते जागच्या जागीं तटस्थ राहात. मग वर सांगितलेले त्यांचे नोकर

---

* सर ऐझाक न्यूटन् ह्या विख्यात तत्त्ववेत्त्याच्या संबधानें ही वर सांगितलेली गोष्ट या ग्रंथकारास सुचली असावी असें म्हणतात. तो न्यूटन् ह्याविषयीं अशी गोष्ट सांगे कीं, एकदा त्याचा नोकर त्याला, जेवणाची तयारी झाली, चलावें, असे सांगून गेला; पण कांहीं वेळपर्यंत तो आला नाहीं असें पाहून तो नोकर पुनः त्याजकडे आला, आणि पहातो तों ही स्वारी, पुस्तकांच्या कपाटाला शिडी लाविलेली होती तिजवर, डाव्या हातांत एक पुस्तक घेतलेलें, व उजव्या हातावर डोकें ठेविलेलें, अशा प्रकारें बसलेली त्याच्या दृष्टीस पडली ! त्या वेळीं त्याचें मन विचारांत इतकें निमग्न होऊन गेलें होतें कीं, त्या नोकरानें त्याला एकदोन वेळां हांक मारिली तरी तो कांहीं हूं कीं चूं करीना. शेवटीं त्यास त्यानें जेव्हां हालविलें, तेव्हां त्याजकडे त्याचें लक्ष गेलें !

( ज्यांना यापुढें ‘ फटकेवाले ’ असें सांकेतिक नांव दिलें आहे,) हे पूर्वोक्त रीतीनें त्यांचें अवधान ठिकाणावर आणीत, तेव्हां ते पुढें चालावयास लागत.

शेवटीं आम्ही राजवाड्यांत गेलों, आणि ज्या ठिकाणीं राजेसाहेबांची स्वारी सिंहासनावर विराजमान झाली होती, त्या कचेरींत त्या लोकांनीं मला नेलें. राजाच्या भोंवतीं पुष्कळ मोठमोठे लोक बसले होते. सिंहासनापुढें एक मोठें थोरलें मेज ठेविलेलें असून त्यावर पुष्कळ प्रकारचे गोल व गणितसंबंधी नानातऱ्हेचीं यंत्रें वगैरे सामान ठेविलेलें होतें. आम्ही तेथें गेल्यावर दरबारांतील लोकांत बरीच चळवळ सुरू झाली. तथापि राजानें आमच्याकडे नुसतें पाहिलें देखील नाहीं. कारण तो एक गणितसंबंधी प्रश्न सोडविण्यांत अगदीं गढून गेला होता. त्याचा तो प्रश्न सुटण्यास सुमारें एक तास लागला, व तेथपर्यंत आम्हांस तसेंच त्या ठिकाणीं उभें रहावें लागलें. त्याच्या दोहों बाजूंकडे दोन हुजऱ्ये उभे असून त्यांच्या हातीं मागें सांगितलेल्या पिशव्या होत्या; आणि जेव्हां तो रिकामा झाला असें त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांच्यापैकीं एकानें आपल्या पिशवीनें त्याच्या तोंडास व दुसऱ्यानें उजव्या कानास हळूच फटका दिला. तेव्हां एकाएकीं ज्याप्रमाणें मनुष्य झोंपेंतून जागा होतो त्याप्रमाणें तो दचकला, आणि माझ्याकडे व माझ्या बरोबरच्या मंडळीकडे पाहून आमच्या येण्याच्या संबंधानें त्यास स्मरण झालें; कां कीं, याविषयींची वर्दी त्यास पूर्वींच पोहोंचली होती. तो कायसें बोलला, इतक्यांत एक मनुष्य माझ्याजवळ येऊन त्यानें माझ्या उजव्या कानाला आपल्या पिशवीचा फटका दिला. पण मला असल्या उपचारांची कांहींएक जरूर नाहीं असें मीं त्यास पुष्कळ प्रकारच्या

खुणांनीं दर्शविलें. यावरून राजा व ते दरबारी लोक यांचा एकंदरीनें असा ग्रह झाला कीं, याची समजूत फारच कोती असावी. ( ही गोष्ट मला मागाहून कळली. ) राजानें मला कांहीं प्रश्न केलेसें मला त्याच्या बोलण्यावरून वाटलें. त्यावरून मला येत होत्या तितक्या सर्व भाषांत मीं त्यास उत्तरें दिलीं. परंतु जेव्हां त्याच्या लक्षांत आलें कीं, आपण काय बोलतों हें याला समजत नाहीं व याचेंही बोलणें आपणास समजत नाहीं, तेव्हां त्याच्या हुकमावरून त्या वाड्यांतील एका खोलींत मला नेलें, व त्या ठिकाणीं माझ्या तैनातीस दोन नोकर दिले. कारण परदेशीय लोकांचें आगतस्वागत करण्याच्या संबंधानें या राजाची याच्या पूर्वजांपेक्षांही विशेष कीर्ति आहे. जेवणाची तयारी झाली तेव्हां चार बडे लोक माझे पंक्तीस भोजनास बसले. त्यांस मीं दरबारांत राजाच्या अगदीं सन्निध बसलेले पाहिले होते. आमच्यापुढें तीन तीन ताटें ठेविलीं. त्यांत नानाप्रकारचीं पक्वान्नें वाढलेलीं होतीं. परंतु विशेष सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, बहुतकरून सर्व पदार्थांचे आकार, गणितसंबंधी यंत्रें व अनेक प्रकारचीं वाद्यें यांच्यासारखे होते. आम्ही जेवीत असतां मीं त्यांस त्या वाढलेल्या पदार्थांपैकीं पुष्कळांचीं त्यांच्या भाषेंतील नांवें विचारलीं; आणि त्या थोर लोकांनीं आपल्या त्या पिशवीवाल्या नोकरांच्या मदतीनें माझ्या प्रश्नांचीं उत्तरें मोठ्या आनंदानें दिलीं. त्यांस असें वाटलें कीं, जर आपणांशीं यास बोलतां येऊं लागलें, तर आपल्या योग्यतेच्या संबंधानें याची खात्री होऊन जाईल. मलाही लवकरच, जो जो पदार्थ लागे तो तो, त्यांच्या भाषेंत मागतां येऊं लागला.

जेवणें झाल्यावर, माझ्याबरोबर जेवावयास आलेले लोक निघून गेले, आणि एक मनुष्य आपल्या नोकरासह राजाच्या हुकुमानें तेथें आला. त्यानें आपल्याबरोबर दौत, लेखण्या, कागद आणि तीन चार पुस्तकें आणिलीं होतीं. मी तुम्हांस आमची भाषा शिकविण्यास आलों आहें, असें त्यानें मला खुणांनीं दर्शविलें. आम्ही एकंदर सुमारें चार तास बसलों. ह्या वेळांत त्यानें सांगितलेले पुष्कळ शब्द मीं कागदावर एकाखालीं एक लिहून घेऊन त्यांच्या पुढें त्यांचे अर्थही लिहिले. त्याचप्रमाणें मी कितीएक लहान लहान वाक्येंही शिकलों. तीं अशीं कीं, जेव्हां माझा शिक्षक माझ्याजवळच्या नोकरास सांगे, ' अरे तें इकडे आण, इकडे वळ, नमस्कार कर, खालीं बैस, उभा रहा, चाल, ' वगैरे, तेव्हां मीं त्याच्या तोंडचीं तीं लहान लहान वाक्यें लिहून घेत असें. त्यानें मला एका पुस्तकांत सूर्य, चंद्र, तारे, राशिचक्र, क्रांतिवृत्त, आणि ध्रुववृत्त यांचीं चित्रें दाखविलीं; त्याचप्रमाणें कित्येक क्षेत्रांच्या व लहान पदार्थांच्या आकृतींचीं नांवें सांगितलीं; तसेंच त्यानें मला तिकडील सर्व वाद्यांचीं नांवें व त्यांच्या संबंधाची माहिती सांगितली; आणि तीं वाजविण्यासंबंधाचे पारिभाषिक शब्दही सांगितले. इतकें झाल्यावर तो निघून गेला. नंतर मीं उतरून घेतलेले शब्द त्यांच्या अर्थांसह वर्णानुक्रमानें लिहिले. याप्रमाणें थोडक्याच दिवसांत त्या लोकांची भाषा मला साधारणपणें कळावयास लागली. ह्या कामीं मला माझी स्मरणशक्ति फारच उपयोगीं पडली.

राजानें मला ज्या लोकांच्या ताब्यांत दिलें होतें, त्यांनीं माझ्या अंगावरचे कपडे फारच खराब झालेले पाहून, दुसरे दिवशीं एका शिंप्यास बोलाविलें, आणि मजकरितां

कपडे बेतावयास त्यास सांगितलें. युरोपखंडांतील शि-प्यांची जी काम करण्याची रीत आहे तीपेक्षां ह्या मनुष्याची रीत मला फारच भिन्न दिसून आली. त्यानें प्रथम तुरीय-यंत्रानें ( सूर्ययंत्रानें ) माझी उंची मोजली, आणि नंतर आंखणीनें व कंपासानें माझ्या शरिराचें आकारमान एका कागदावर उतरून घेतलें; आणि सहा दिवसांनीं माझे सर्व कपडे तयार करून आणिले. पण त्याच्या बेतण्याच्या हिशेबांत कांहीं चूक झाल्याकारणानें ते फारच खराब हो-ऊन त्यांचा आकार आपला कांहीं तरी झाला होता ! परंतु असल्या गोष्टींचा मला पुष्कळ वेळां अनुभव आले-ला असून त्याजकडे मी फारसें लक्षही देत नसें, यामुळें याही गोष्टीचें मला कांहीं विशेष वाटलें नाहीं.

मला कपडे वगैरे नसल्याकारणानें व माझी प्रकृतीही किंचित् बेआराम असल्यामुळें कांहीं दिवसपर्यंत मी कोठें गेलों आलों नाहीं. ह्या वेळांत मीं आपल्या पूर्वी सांगितले-ल्या शब्दसंग्रहांत आणखी पुष्कळ शब्द घातले; आणि पुनः जेव्हां मी दरबारांत गेलों, तेव्हां राजा जें कांहीं बो-लला तें बरेंच मला समजलें, आणि मींही त्यास थोडथोडीं उत्तरें दिलीं.

मग राजानें हुकूम केला कीं, आतां बेटानें प्रथम पूर्वे-कडे वळून नंतर ईशान्येकडे वळावें, आणि लगाडो शहरा-च्या नीट वरचे बाजूस जाऊन उभें रहावें. हें शहर या राजाच्या ताब्यांतील सर्व अचल प्रदेशाची राजधानी आहे. आम्हीं हल्लीं होतों तेथून तें सुमारें दीडशें कोसांच्या अं-तरावर असून आम्हांस तेथें पोहोंचण्यास साडेचार दिवस लागले. तें बेट हवेंतून चाललें असतां मला त्याच्या गती-चा किंचित् देखील भास झाला नाहीं. दुसरे दिवशीं

सुमारें अकरा वाजतां स्वतः खासा स्वारी, मानकरी, सरदार लोक, व कारभारी मंडळी वगैरे आपापलीं वाद्यें लावून तीन तासपर्यंत एकसारखे तीं वाजवीत बसले; व त्यामुळें माझ्या अगदीं कानटाळ्या बसून गेल्या. हा अलौकिक प्रकार काय असावा, याचा मला कांहीं अर्थ कळेना. तेव्हां मीं आपल्या शिक्षकास त्यासंबंधानें माहिती विचारली. तो म्हणाला, ' आमच्या ह्या बेटांतील लोकांस इतर ठिकाणच्या लोकांच्या वाद्यविद्येची गोडी लागून ते त्या विद्येंत मोठे प्रवीण झाले आहेत; आणि जीं जीं वाद्यें वाजविण्यांत वरील लोकांची विशेष ख्याति आहे, त्यांपैकीं कोणतेंही वाद्य वाजविण्यांत आमचे दरबारचे लोक त्यांच्याशीं सामना करण्यास सांप्रत तयार असल्यामुळें, त्यांचा या कामीं असाच वारंवार पुष्कळ वेळ जातो.'

आम्ही राजधानीकडे चाललों असतां राजानें असा हुकूम केला कीं, ' कित्येक शहरांवर व गांवांवर बेटानें उभें रहावें, व तेथून खालील रयतेच्या अर्ज्या वगैरे घ्याव्या. ' ह्या कारणास्तव कित्येक दोऱ्यांस वजनें बांधून त्या खालीं सोडण्यांत आल्या. अर्जदार लोकांनीं आपले अर्ज ह्या दोऱ्यांस ओंवले, व पतंगाच्या जामिनाप्रमाणें ते अर्ज वर येऊन पोहोंचले. मधून मधून लोकांकडून आह्मांस शिधासामुग्री वगैरे आली, ती आम्हीं कप्यांच्या योगानें वर घेतली.

मी गणितविद्येंत पारंगत असल्यामुळें मला त्या लोकांच्या भाषेचें ज्ञान होण्यास फारशी पंचाईत पडली नाहीं. कारण वरील विद्या व वादनकला यांवरच बहुतकरून त्या भाषेचें बस्तान बसविलेलें आहे. त्यांतून वादनकलेंतही मी प्रवीण होतोंच. त्यांच्यांतील सर्व कल्पना, रेषा व आकृति

ह्यांवर बसविलेल्या आहेत. उदाहरणार्थ, एखाद्या स्त्रीच्या अगर इतर प्राण्याच्या सौंदर्याचें वर्णन करणें झाल्यास, चौकोन, वर्तुळ, आणि भूमितींतील दुसरे पारिभाषिक शब्द, अगर वादनकलेंतील शब्द यांनीं ते करीत. राजवाड्यांतील स्वैंपाकघरांत गणित व वाद्यविद्या यांसंबंधी सर्व प्रकारचीं यंत्रें ठेविलेलीं असून राजाला भोजनाचे वेळीं जे पदार्थ वाढीत त्यांच्या आकृतीही वरील यंत्रांप्रमाणेंच केलेल्या असत.

त्या देशांतील घरें बांधण्याची रीत फारच वाईट असून त्या घरांच्या भिंती अगदीं एकमेकींशीं निमुळत्या मिळालेल्या असतात--म्हणजे कोणत्याही जागीं त्यांच्या योगानें काटकोन झालेला कधींही आढळावयाचा नाहीं. या उणेपणाचें कारण हेंच कीं, भूमितीचा व्यावहारिक उपयोग करण्याचा त्यांना फार तिरस्कार आहे; कारण तसें करणें हें केवळ अडाणीपणाचें काम असून त्यांत कारागिराची स्वतःची अक्कल मुळींच दिसून येत नाहीं असें ते म्हणतात. आणखी दुसरी गोष्ट अशी कीं, सदहू कामें करणारांस, ते लोक, अमुक काम अमुक रीतीनें करावयाचें ह्मणून ज्या प्रकारें सांगतात, तो प्रकार समजून घेण्याची शक्ति त्या काम करणारांचे अंगीं नसल्यामुळें ते सर्व कामाचा बिघाड मात्र करून टाकितात. आणि कागद रेंखाटतांना आंखणी कशी धरावी, वर्तुळ काढतांना कंपास कसा फिरवावा, अशा गोष्टींत जरी त्यांची हुशारी अगदीं सोळा आणे दिसून येत असे, तरी व्यवहारसंबंधी साधारण गोष्टींत त्यांच्यासारखा अडाणीपणा व मूर्खपणा इतर कोणत्याही लोकांत नसेल असें मला दिसून आलें. तसेंच गणित व वाद्यविद्या यांखेरीज इतर कोणत्याही विषयाची त्यांना समजूत पडण्यास फारच आयास पडत असेंही माझ्या पहाण्यांत

आलें. हे लोक फार कुतर्कवादी असून दुसऱ्याचें मत हाणून पाडण्याचे कामांत यांचा मला विलक्षण आवेश दिसून आला. आतां त्यांचे विचार जेव्हां रास्त असत तेव्हां अशा प्रकारचा मतभेद दृष्टीस पडत नसे; तथापि तशी गोष्ट फारच विरळा. कारण कल्पनाशक्ति, तर्क, युक्ति, वगैरे गोष्टींचा त्यांस गंधही नाहीं; व वरील गोष्टींचे व्यंजक शब्दही त्यांच्या भाषेंत नाहींत; कां कीं, त्यांचे विचार आणि मनोवृत्ति यांचा सर्व खेळ पूर्वोक्त दोन विद्यांमध्येंच काय तो चालावयाचा !

त्यांच्यांतील बहुतेक लोक, आणि त्यांतून विशेषत: ज्यांस खगोलविद्येचें अंग असतें, त्यांचा फलज्योतिषावर मोठा विश्वास असतो. तथापि प्रसिद्धपणें ती गोष्ट कबूल करण्यांत त्यांना फार हलकेपणा वाटतो. परंतु एक गोष्ट पाहून मला फारच आश्चर्य वाटलें, व त्या गोष्टीचें कारण माझ्या मुळींच लक्षांत आलें नाहीं. ती ही कीं, इकडच्या तिकडच्या बातम्या आणि राज्यप्रकरणी गोष्टी यांचा नेहमीं काथ्या कुटीत बसण्याची त्यांना फारच हौस असते; व राज्यांत अमुक काम कसें चाललें आहे, अमुक कामाचा निकाल कसा काय झाला, वगैरे गोष्टींच्या त्यांच्या आपापसांत नेहमीं चवकशा चाललेल्या असतात. तसेंच राजकारस्थानांच्या गोष्टींच्या संबंधानें आपले विचार प्रदर्शित करणें, आणि एका पक्षाच्या लोकांनीं दुसऱ्या पक्षाच्या लोकांच्या मताचे अगदीं धुडके धुडके उडवून देणें, या गोष्टींत त्यांचा केवळ हातखंडा आहे. युरोपखंडांतही जे गणितवेत्ते आहेत, त्या बहुतेकांत अशा प्रकारचे वादविवाद होतात. तथापि गणितविद्या व राजकारस्थान या दोन गोष्टींत कोणत्याही प्रकारचें साम्य आहे असें मला मुळींच वाटत

नाहीं. आतां इतकें मात्र खरें कीं, ज्याप्रमाणें, वर्तुळ केवढेंही असो, लहान अगर मोठें, त्याचे अंश सारखेच असावयाचे हें गृहीत आहे, त्याचप्रमाणें एकादा कृत्रिम गोल फिरविण्यास जितकें सामर्थ्य लागेल, तितकेंच पण साऱ्या जगाचेंही नियमन करण्यास लागेल, हेंही गृहीत घेऊन चाललें, तर मात्र पूर्वी सांगितलेल्या दोन विषयांत साम्य आहे असें म्हणतां येईल ! असो, पण वरील लोकांस मी त्याबद्दल फारसा दोष देत नाहीं; कां कीं, एकंदर मनुष्यजातीच्या स्वभावदौर्बल्याचा हा गुणच आहे; तो असा कीं, ज्या गोष्टींत आपला मुळींच संबंध नाहीं, व ज्यांचा विचार करण्यास स्वभावतः अगर अभ्यासानेंही आपण सर्वथैव अयोग्य आहों, अशा गोष्टींची आपली रिकामी पंचाईत करीत बसावयाचें !

या लोकांचीं मनें कधींही स्थिर नसून कांहीं तरी घोर त्यांच्या मागें लागलेला असतो. परंतु ही एक मोठी ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, त्यांच्या मनाची अस्थिरता होण्यास ज्या गोष्टी कारणीभूत होतात त्यांचा पृथ्वीवरील इतर कोणत्याही लोकांशीं मुळींच संबंध नसतो ! ह्मणजे, खगोलांतील पदार्थांचे जे फेरफार होतात, त्यांच्या परिणामाविषयीं त्यांस भीति उत्पन्न होऊन त्या योगानें त्यांच्या मनाची अशी चलबिचल होत असते. उदाहरणार्थ, सूर्य आपल्या दैनंदिन गतीनें एकसारखा पृथ्वीजवळ येत आहे, तेव्हां तो कधीं तरी शेवटीं तिला गिळून टाकील, तसेंच सूर्यावर त्याच्याच श्वासोच्छ्वासांच्या योगानें गंज चढून चढून शेवटीं त्यापासून पृथ्वीस मुळींच उजेड मिळेनासा होईल, असें ते ह्मणतात. त्याचप्रमाणें नुकताच जो धूमकतु

उगवला होता, त्याच्या शेंपटाचा धक्का पृथ्वीस लागावयास थोडें अंतर राहिलें होतें ह्मणून बरें झालें; नाहींतर तिचा अगदीं चुराडा होऊन जाण्याची त्यांस मोठी भीति पडली होती; व आतां हा धूमकेतु पुनः एकशें छत्तीस वर्षांनीं उगवेल असें त्यांनीं वर्तविलें असून त्याचे योगानें प्रायः जगाचा अंतच होईल, असें त्यांनीं भाकित केलें आहे. कारण ते असें ह्मणतात कीं, हें नक्षत्र आपल्या कक्षेमधून सूर्याभोंवतीं फिरतां फिरतां जेव्हां त्याजपासून कांहीं नियमित अंतरावर येऊन ठेपेल, तेव्हां भट्टींत तापून लाल झालेल्या लोखंडाच्या उष्णतेपेक्षां दहा हजारपट अधिक उष्णता त्याला पोहोंचेल, आणि तें सूर्यापासून जेव्हां फारच दूर असेल, तेव्हां त्याच्या शेंपटाची लांबी १२५० योजनांहून अधिक होईल; आणि पृथ्वी आपल्या कक्षेमधून फिरत असतांना त्याच्या त्या आगीच्या लोळासारख्या शेंपटाचा किंचित्‌ही स्पर्श जर का तीस झाला, तर एका क्षणांत तिचा भडका होऊन राखरांगोळी होईल, असें त्यांचें म्हणणें आहे. त्याचप्रमाणें सूर्याचें तेज प्रत्येक दिवशीं खर्च होत असून त्याला नवीन पुरवठा तर मुळींच होत नाहीं, यामुळें सरतेशेवटीं तें सर्व नाहींसें होऊन चोहोंकडे अंधारमय होऊन जाईल; आणि असें झालें म्हणजे अर्थात् पृथ्वी व इतर ग्रह, ज्यांना सूर्यापासून उजेड मिळतो, त्या सर्वांचा नाश होईल, म्हणून त्यांना पराकाष्ठेची भीति पडली आहे.*

वर सांगितलेल्या व अशाच दुसऱ्या प्रकारच्या विचारांनीं त्या लोकांचीं मनें नेहमीं इतकीं कांहीं अस्थिर झालेलीं

* ह्या ग्रंथकाराच्या वेळीं, गणितविद्येंत प्रवीण म्हणून ज्यांची ख्याति असे, अशा लोकांच्या ह्या कल्पना होत्या.

असतात कीं, त्यांस झोंप सुद्धां चांगली येत नाहीं. तसेंच संसारांतील नानाविध व्यवसायांच्या योगानें इतर लोकांस जें सुख व आनंद होत असतो, त्यापासून हे अगदीं विमुख असतात. सकाळच्या प्रहरीं एकाद्याला कोणी त्याच्या ओळखीचा मनुष्य भेटला म्हणजे त्यास त्याचा पहिला प्रश्न असा असतो : 'कसें काय बोवा ! सूर्याच्या संबंधानें कांहीं कमजास्त नाहीं ना ? काल तो मावळला तेव्हां कसा दिसत होता, व आज उगवला तेव्हां कसा दिसला ? बरें आतां पुढें जो धूमकेतु उगवणार, त्याच्या भयशमनाचा कांहीं उपाय निघतो कीं नाहीं ? ' या अशा प्रकारच्या संभाषणाच्या योगानें त्या लोकांच्या मनाची स्थिति अगदीं मुलांच्यों सारखी होते : कशी तर राक्षस, भुतें, वगैरेंच्या भयंकर गोष्टी ऐकतांना मात्र मुलांस हौस वाटते, पण रात्रीं निजावयाला जाण्याचे वेळीं त्या गोष्टी मनांत येऊन मग त्यांना भीति वाटावयास लागते !

सुमारें एक महिन्यांत त्या लोकांची भाषा मला बरीच समजूं लागली, आणि मी दरबारांत जाई तेव्हां मला राजा जे जे प्रश्न करी, त्या बहुतेकांचीं उत्तरें मला देतां येऊं लागलीं. मी जे जे देश फिरलों, तेथील लोकांचे कायदे, राज्यव्यवस्था, धर्म, रीतीभाती वगैरेंच्या संबंधानें राजानें मला अक्षर देखील विचारिलें नाहीं; तर फक्त गणितविद्येसंबंधाची तेवढी माहिती विचारिली; व ती मी सांगत असतां जरी त्याला दोहोंकडून दोन फटकेवाले मजकडे लक्ष देण्याविषयीं वारंवार सूचना करीत होते, तरी तीही त्यानें लक्षपूर्वक ऐकिली नाहीं; इतकेंच नव्हे, तर तिचा त्यास अगदीं तिरस्कार वाटला असें दिसलें.

## प्रकरण ३.

ह्या बेटांत ज्या कांहीं चमत्कारिक चिजा असतील त्या पहाण्याविषयीं मला परवानगी मिळावी म्हणून मीं राजास विनंती केली. त्यानें कृपा करून माझी विनंती मान्य केली, आणि माझ्या शिक्षकास मजबरोबर यावयास सांगितलें. सदरील बेटाचें स्थलांतर होतें याचें कारण काय असावें, म्हणजे तें कांहीं युक्तीच्या योगानें फिरतें अगर त्याच्या अंगीं हा कांहीं स्वभावसिद्धच गुण आहे—हें मुख्यत्वें-करून जाणण्याची मला इच्छा होती.

ह्या उडत्या बेटाचा आकार अगदीं वर्तुळ असून याचा व्यास सुमारें अडीच कोस आहे, आणि क्षेत्रफळ दहा हजार एकर आहे. याची उंची अजमासें सहाशें हात आहे. तळची बाजू म्हटली म्हणजे वज्राची सुमारें चारशें हात जाडीची एक सपाट शिळाच आहे. ही बाजू खालून पाहणारास दिसते. हिच्यावर खनिज पदार्थ त्यांच्या त्यांच्या क्रमानें असून, ह्या सर्वांचेवर सुमारें सात हात जाड मातीचा थर आहे. या बेटाचा पृष्ठभाग परिघाकडून मध्याकडे अगदीं उतरता होत गेला असल्यामुळें पाऊस आणि दंव यांचें पाणी लहान लहान प्रवाहांनीं मध्य देशाकडे जातें, व तेथून सुमारें पांचशें हातांचे अंतरावर मोठालीं चार तळीं आहेत त्यांत तें पडतें. ह्या प्रत्येक तळ्याचें क्षेत्रफळ सुमारें अर्ध्या कोसाचें आहे. ह्या तळ्यांतील पाण्याची सूर्याच्या उष्णतेनें नेहमीं वाफ होऊन जात असल्याकारणानें तीं भरून वाहूं लागत नाहींत. शिवाय राजाची मर्जी लागेल त्या वेळेस धुकें व मेघमंडळ यांच्याही वर तो बेट नेऊं शकतो. तेव्हां अर्थातच त्यावर पाऊस व दंव पडण्याचें बंद ठेवणें त्याच्या

हातचें आहे. कारण मेघ जमिनीच्या पृष्ठभागापासून फार तर एक कोस उंच जातात असें सृष्टिशास्त्रवेत्त्यांचें म्हणणें आहे. निदान ही गोष्ट त्या प्रदेशास तरी लागू आहे यांत संशय नाहीं.

बेटाच्या मध्यभागीं एक खालीं जाण्यास द्वार आहे. त्याची रुंदी सुमारें शंभर हात आहे. या मार्गानें ज्योतिषी लोक एका मोठ्या इमारतींत उतरतात. बेटाच्या तळीं जी वज्राची सुमारें चारशें हात लांबीची शिळा आहे, तिच्या बरोबर मध्यावर वरील इमारत आहे. या इमारतींत रात्रंदिवस वीस दिवे जळत असतात. त्यांचा उजेड त्या वज्राच्या शिळेवर पडून त्याचें परावर्तन चोहोंकडे होत असल्याकारणानें जिकडे तिकडे लखलखाट झालेला असतो. या ठिकाणीं सूर्ययंत्रें, दुर्बिणी वगैरे ज्योतिषशास्त्रसंबंधी साहित्य फार भरलेलें आहे. त्यांत एक विशेष सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, तेथें कोष्टच्याच्या धोट्याच्या आकाराचा लोहचुंबकाचा एक भला मोठा जंगी गोळा आहे, त्यावर त्या बेटाचें तारणमारण काय तें सर्व आहे. त्याची लांबी सुमारें बारा हात व अतिशय जाडी म्हटली म्हणजे अठरा हात आहे. ह्या गोळ्याच्या मधोमध एक भोंक असून त्याच्यांतून एक वज्राचा दांडा घातलेला आहे. हा दांडा, दुसऱ्या एका वज्राच्याच लंब वर्तुळाला बारा इंचांची मधोमध खांचणी पाडून, त्यांत बसविलेला आहे. हा दांडा वरील लोहचुंबकाच्या धोट्याच्या बरोबर मध्यबिंदूतून गेला असल्यामुळें तें धोटें फिरविण्यास मुळींच आयास पडत नाहींत. वर सांगितलेल्या लंबवर्तुळाची उंची सुमारें तीन हात असून जाडीही तितकीच आहे, व व्यास सुमारें चोवीस हात आहे. याला बारा बारा हात उंचीचे आठ पाय

आहेत. वरील लोहचुंबकाचें घोटें कोणत्याही रीतीनें हालवितां येणार नाहीं; कारण त्याच्या सभोंवतालचें लंबवर्तुळ व त्याचे पाय हे बेटाच्या तळीं असणाऱ्या वज्राचेच भाग आहेत.

वरील लोहचुंबकाच्या धोट्याच्या योगानेंच हें बेट वर, खालीं किंवा पाहिजे त्या दिशेस जातें; कारण या धोट्याच्या एका टोंकाला आकर्षणशक्ति आणि दुसऱ्या टोंकाला दूरीकरणशक्ति आहे; व हे दोन गुण ह्या राजाच्या राज्याच्या ज्या मर्यादा आहेत, तेवढ्यापुरतेच ह्या धोटयाच्या अंगीं आहेत. लोहचुंबकाच्या धोट्याच्या ज्या टोंकास आकर्षणशक्ति आहे, तें टोंक खालीं पृथ्वीकडे केलें असतां बेट खालीं उतरतें, आकाशाकडे केलें असतां वर जातें, आणि तिरकस केलें असतां बेट तिरकस चालूं लागतें. ह्या तिरकस गतीच्याच योगानें राजाच्या अमलांतील मुलखांत चोहोंकडे हें बेट जातें.

परंतु ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, राजाच्या अमलाखालचा जेवढा अचल प्रदेश आहे, तेवढ्यावरच काय तें हें बेट फिरतें; त्याचप्रमाणें त्याची उंच जाण्याची मर्यादा दोन कोसांहून अधिक नाहीं. याविषयींचीं कारणें तेथील विद्वान् ज्योतिषांनीं आपल्या ग्रंथांत दिलीं आहेत, तीं अशीं:— लोहचुंबकाच्या शक्तीचा परिणाम दोन कोसांहून ज्यास्ती अंतरावर मुळींच होत नाहीं; तसेंच राजाच्या ताब्यांतील जो अचल प्रदेश आहे, त्याच्या पोटांत, आणि समुद्रकिनाऱ्यापासून सुमारें नऊ कोसपर्यंत पाण्यामध्यें, एक प्रकारचा धातु आहे, त्याचा मागें सांगितलेल्या लोहचुंबकाच्या धोट्यावर कांहीं विशेष परिणाम होतो; व हा धातु भूगोलाच्या इतर भागांत मुळींच नाहीं. तेव्हां सद-

रील लोहचुंबकाच्या धोंड्याच्या आकर्षणशक्तीच्या मर्यादेंतील कोणताही प्रदेश आपल्या ताब्यांत आणणें हें या वरील उत्तम सोयीच्या योगानें तेथल्या राजास फारच सुलभ होऊन गेलेलें आहे.

तें लोहचुंबकाचें धोंटें क्षितिजाशीं समांतर रेषेंत ठेविलें म्हणजे बेट स्थिर रहातें. कारण या वेळीं त्या धोंड्याचीं दोन्हीं टोंकें पृथ्वीशीं समांतर राहिल्यामुळें दोहोंकडून आंकर्षणशक्तीचा जोर सारखा होतो; आणि त्यामुळें अर्थात् बेटाची गति बंद होते.

ह्या लोहचुंबकाच्या धोंड्याच्या देखरेखीकारितां कांहीं ज्योतिषी नेमिलेले असतात. ते राजाच्या हुकुमाप्रमाणें बेटाचें स्थित्यंतर करितात. या लोकांच्या आयुष्याचा बहुतेक काळ आकाशांतील ताऱ्यांचा वेध घेण्यांत जातो. या कामीं ते दुर्बिणींचा उपयोग करितात, व त्या आपलेकडील दुर्बिणींपेक्षां फारच उत्कृष्ट असतात. कारण, त्यांच्या दुर्बिणींची अतिशय लांबी म्हटली म्हणजे सुमारें दोन हातांहून अधिक नसून आपलेकडील ७० हात लांबीच्या दुर्बिणींपेक्षां त्यांतून फारच चांगलें दिसतें. या कारणामुळें या लोकांनीं युरोपखंडांतील ज्योतिषांपेक्षां पुष्कळ मोठमोठाले शोध लाविले आहेत. त्यांनीं दहा हजार नक्षत्रांचा शोध लाविला आहे, व आपले ज्योतिषांस तर अद्यापि ह्याच्या एक तृतीयांशाइतकी देखील माहिती मिळालेली नाहीं.

त्यांनीं निरानिराळे ऱ्याणव धूमकेतु शोधून काढिले आहेत; व त्यांचें कालमान अगदीं बरोबर बसविलेले आहे, असें ते खात्रीपूर्वक सांगतात. हें जर खरें असेल तर, त्यांनीं केलेले शोध सर्व जगांत प्रसिद्ध झाल्यास त्यापासून फारच उपयोग होऊन ज्योतिषशास्त्रांतील इतर गोष्टींप्रमाणें धूम-

केतूचीही उपपत्ति लोकांस पूर्णपणें करून येईल. कारण त्या संबंधाची सांप्रत जी माहिती लोकांस आहे, ती फारच कोती आहे.

येथील राजास जर त्याचें प्रधानमंडळ सर्वांशीं अनुकूल होईल, तर त्याच्या सत्ताधीशत्वास पृथ्वींत कोठेंही उपमा सांपडणार नाहीं. परंतु या लोकांच्या वतनवाड्या वगैरे सर्व खालीं अचल प्रदेशांत असल्यामुळें, व राजाची मर्जी ही केवळ ‘ अळवावरच्या पाण्या ’ प्रमाणें असते हें ते पक्कें समजून असल्यामुळें, आपल्या देशास दास्यरूपी पाशांत अडकविण्यास ते कधींही साहाय्यभूत होत नाहींत.

एकाद्या शहरांतील लोकांनीं बंडाळी केली, अगर आपसांत तंटेबखेडे माजविले अथवा रीतीप्रमाणें जो करभार द्यावयाचा तो देण्याविषयीं दंडेली केली, तर त्यांना ताळ्यावर आणण्याचीं राजापाशीं दोन साधनें आहेत. त्यांपैकीं पहिलें साधन अगदीं सामोपचाराचें आहे; म्हणजे तें बेट, वरील प्रकारचें शहर व त्याच्या आसमंतांतील प्रदेश यांवर आणून उभें करावयाचें. असें झालें म्हणजे खालील लोकांस ऊन व पाऊस हीं मिळेनातशीं होतात. मग अर्थातच त्या ठिकाणीं दुष्काळ पडून नानाप्रकारच्या रोगांच उद्भव होतो. याहून कडक शिक्षेजोगा जर त्या लोकांनीं गुन्हा केलेला असला, तर वरून त्यांवर मोठमोठे दगड टाकितात, व तेणेंकरून त्यांच्या घरादारांचा अगदीं चुराडा होऊन जातो. अशा वेळीं भुयारांत वगैरे जाऊन ते आपला कसा तरी जीव मात्र वांचवितात. परंतु इतकें करूनही जर ते लोक शुद्धीवर न आले, अगर बंड करण्यास प्रवृत्त झाले, तर मग राजा शेवटचा उपाय योजितो. तो असा कीं, तें बेट जो दोर ज्या [illegible] आधार खालीं

सोडितो." मग त्या अनर्थास काय विचारावें ? घरेंदारेंच नुसतीं त्या प्रसंगीं पडून रहात नाहींत, तर लहानमोठीं मनुष्यें वगैरे चटसारे प्राणी यमसदनाची वाट धरितात ! तथापि हा असुरी उपाय करण्याचा राजास क्वचितच प्रसंग येतो; व तोही ही गोष्ट सहसा करीत नाहीं, आणि त्याचे प्रधानमंडळासही असें करण्याविषयीं त्यास सल्ला देववत नाहीं. कारण अशा योगानें ते लोकांस अप्रिय होतील हें एक, व दुसरें, त्यांचीं घरेंदारें वगैरे मालमत्ता खालीं असते तिचीही अर्थात् वरील प्रसंगीं धूळधाण होऊन जाईल; कां कीं, बेटावर संपूर्ण अधिकार राजाचा असून बाकी जे लोक तेथें असतात ते सारे उपरी असतात.'

परंतु तेथील राजे वर सांगितलेला असुरी उपाय एकाएकीं अमलांत आणण्यास मागें पुढें कां करितात याचें मुख्य कारण निराळेंच आहे. तें असें: त्या लोकांस वरील प्रकारचें संकट आपणांवर कधींना कधीं येईल हें माहीतच असतें, त्यामुळें ते अशी सावधगिरी ठेवितात कीं, शहर प्रथम वसावितांना जेथें मोठमोठाले उंच खडक असतील अशीच जागा ते पाहतात. तशी न मिळाल्यास गांवांत मोठमोठालीं उंच देवळें अथवा पाषाणाचे स्तंभ हीं तरी बांधिलेलीं असतात. यामुळें एकाद्या शहराचा नाश करण्याकरितां त्यावर बेट येऊन पडलें म्हणजे वर सांगितलेल्या खडक वगैरेंच्या योगानें त्याच्या तळास जबर धक्का पोहोंचून कदाचित् नुकसानी होईल; व हा सबंध तळ वज्राचा असून ह्याची जाडी सुमारें चारशें हात आहे असें जरी मागें सांगितलें आहे, तरी फार मोठा धक्का बसला असतां त्याच्या योगानें तो तळ फुटण्याचा अगर शहरांतील घरांतल्या विस्तवाची

आंच लागून तडकण्याचा संभव आहे. हें सर्व ते लोक खूब समजून असतात, आणि म्हणूनच आपली स्वतंत्रता अगर मालमिळकत यांच्या संबंधानें आपला हेका कोठपर्यंत चालवावा हें त्यांना चांगलें माहीत असतें; आणि जेव्हां राजाचा क्रोधाग्नि फारच अनावर होतो, व एकाद्या शहराची राखरांगोळी करण्याचा तो निश्चयच करितो, तेव्हां बेट फारच हलके हलके उतरण्याविषयीं तो हुकूम करितो; व ह्याचें कारण, लोकांचा नाश न होईल तेवढा बरा, असें तो बाह्यात्कारीं दाखवितो. परंतु खरें कारण म्हटलें म्हणजे बेटाच्या तळास धक्का लागूं नये हें असतें; कां कीं, तसें झाल्यास लोहचुंबकाच्या आकर्षणशक्तीचें कांहीं न चालून एकदम सर्वच बेट खालीं येऊन पडेल असें तिकडील तत्त्ववेत्त्यांचें म्हणणें आहे.

या देशांतील राज्यरीतीच्या मूळारंभींच्या नियमांप्रमाणें राजा व त्याचे दोघे वडील मुलगे, आणि राणीला मुलें होत असतात तोंपर्यंत ती, ह्यांपैकीं कोणासही बेट सोडून जाण्याचा अधिकार नाहीं.

---

## प्रकरण ४.

मला या बेटांतील लोकांनीं वाईट रीतीनें वागविलें असें जरी म्हणतां येणार नाहीं, तरी इतकें खरें कीं, मजविषयीं त्यांचें फारच दुर्लक्ष असे; इतकेंच नव्हे, तर कांहीं अंशीं माझा ते तिरस्कारही करीत. कारण राजा व एकंदरीनें सर्वच लोक यांस गणित व वाद्यविद्या या दोन विषयांखेरीज इतर कोणत्याही विषयाची बिलकुल अभिरुचि नव्हती, आणि त्या लोकांच्या मानानें वरील दोन विषयांचें मला तर मुळींच अंग नव्हतें असें म्हटलें तरी चालेल; व या कारणास्तव त्यांच्यांत माझी कांहींच चहा झाली नाहीं.

हे लोक मागें सांगितलेल्या दोन्ही शास्त्रांत फारच प्रवीण होते यांत संशय नाहीं; व ह्या दोन्ही विद्या मला अत्यंत प्रिय असून यांत मींही म्हणजे निव्वळ शंखच आहे असें नाहीं; तथापि या लोकांची आपली तऱ्हा कांहीं विलक्षणच कीं, सर्वकाळ त्यांतच निमग्न असावयाचें, दुसऱ्या कोणत्याही गोष्टीकडे मुळींच लक्ष द्यावयाचें नाहीं. या कारणास्तव त्यांच्या संगतीचा मला पराकाष्ठेचा कंटाळा येऊन गेला. मी येथें दोन महिनेपर्यंत होतों; तेवढ्या वेळांत फक्त बायका, वाणीउदमी लोक, फटकेवाले, व दरबारचे हुजऱ्ये वगैरे लोक यांच्याशींच माझें काय तें बोलणेंचालणें होत असे. पण सरतेशेवटीं हेही माझा कंटाळा करूं लागले. तरी इतकें खरें कीं, कित्येक गोष्टींविषयीं मला जेव्हां त्या लोकांस कांहीं विचारण्याचा प्रसंग येई, तेव्हां वरील लोकांकडूनच काय तीं मला सयुक्तिक उत्तरें मिळत. तेव्हां एकंदरीनें, जेथें आपणाला कोणी विचारीत नाहीं, अशा स्थळीं रहाण्यांत तरी काय मजा आहे, असें वाटल्यावरून मीं संधि सांपडतांच तेथून निघण्याचा निश्चय केला; व आतां त्यांच्या भाषेचेंही मला बरेंच ज्ञान झालें होतें, यामुळें तिकडूनही कांहीं अडचण राहिली नव्हती. खेरीज बेटांत जें कांहीं पहाण्यासारखें होतें तें सर्व मीं पाहून टाकलें होतें. यामुळें मलाही आतां तेथें रहाणें कंटाळवाणें झालें होतें.

राजाच्या दरबारीं एक मुत्सद्दी होता. तो राजाचा अगदीं जवळचा नातलग होता; व याच कारणास्तव तेथें त्याचा मोठा मानमरातब असे. एरव्हीं पाहिलें तर, तो केवळ मूर्खांचा शिरोमणीच असें सर्व लोक त्यास समजत असत. पण त्यानें सरकारचीं मोठमोठीं महत्वाचीं कामें केलीं होतीं; व तो स्वभावतः मोठा गुणी मनुष्य असून व्यासंगानेंही त्यानें

बहुत ज्ञान संपादिलेलें होतें. तसेंच तो मोठा अब्रूदार व सचोटीचा मनुष्य होता. परंतु त्याच्यांत एक मोठी गोम ही होती कीं, वाद्यविद्येचा आणि त्याचा बारावा बृहस्पति! त्याचे जे कोणी द्वेष्टे होते, त्यांनीं अशी सुद्धां कंडी उठवून दिली होती कीं, 'ह्या लेंकाला अजून ताल सुद्धां बरोबर धरतां येत नाहीं!' आणि गणितविद्येच्या संबंधानेंही त्याची सदर्हूप्रमाणेंच हांकाहांक होती. ती इतकी कीं, भूमितींतील साधारण सिद्धांतही त्याला समजून देण्यास त्याच्या शिक्षकांस पराकाष्ठेची मारामार पडत असे. ह्या गृहस्थाची मजवर मोठी मेहेरनजर होती. तो मला कित्येक वेळां येऊन भेटत असे, व युरोपखंडांतील राज्यव्यवस्थेसंबधी वगैरे माहिती विचारीत असे. मी जें कांहीं त्यास सांगें, तें तो लक्षपूर्वक ऐकत असे; आणि त्यावर जे आपले विचार तो प्रकट करी ते फार शहाणपणाचे असत. त्याच्या तैनातीला फटकेवाले असत; पण त्याला त्यांची जरूर मुळींच लागत नसे. फक्त दरबारांत अगर कोठें समाजांत वगैरे गेल्यास त्यांस तो शोभेकरितां आपल्याबरोबर नेई.

ह्या वरील गृहस्थास मीं विनंती केली कीं, 'मला येथून जाण्यास परवानगी मिळण्याविषयीं राजेसाहेबांपाशीं आपण मजकरितां खटपट कराल तर मोठी मेहेरबानी होईल.' त्यानें माझ्या ह्मणण्यास मोठ्या दुःखानें रुकार दिला. तो मला म्हणाला, 'तुह्मी येथें रहाल तर तुमचा अनेक रीतींनीं मी फायदा करून देईन.' परंतु मीं त्यास ह्मटलें, 'आपण मजवर अनुग्रह करितां त्याजबद्दल मी आपला फार आभारी आहें; तथापि येथून जाण्यांतच मला संतोष आहे.'

फेब्रुआरीचे १५ वे तारखेस राजा व दरबारचे लोक यांचा मीं निरोप घेतला. राजानें मला दोन हजार रुपये

बक्षीस दिले; आणि त्याचा नातलग म्हणजे मागें सांगितलेला मुत्सद्दी यानेंही तितकीच रक्कम मला आणखी दिली. शिवाय त्यानें आपल्या लगाडो येथील एका मित्रास एक शिफारशीचें पत्रही दिलें. वरील शहर त्या देशाची राजधानी आहे. असो; या वेळीं बेट राजधानीपासून एका कोसावर एका डोंगरापाशीं फिरत होतें. नंतर ज्या रीतीनें त्या लोकांनीं प्रथम मला वर घेतलें होतें, त्याच रीतीनें ह्मणजे बेटाच्या अगदीं खालच्या ओट्यावरून खालीं सोडून दिलें.

ह्या उडणाऱ्या बेटावरील राजाच्या ताब्यांत अचल प्रदेश आहे, त्याला 'बाल्निब्रार्बी' असें ह्मणतात. त्याची राजधानी लगाडो नामें शहर आहे हें पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे. मी खालीं स्थिर भूमीवर येतांच मला जरासें समाधान वाटलें. मीं लागलाच तडक शहराचा रस्ता धरिला. माझा पोषाक वगैरे तेथील लोकांप्रमाणेंच असून मला त्यांच्याशीं बोलण्याइतकी त्यांची भाषा अवगत झाली होती, यामुळें मला कसलीही पंचाईत पडली नाहीं. पूर्वी सांगितलेल्या मुत्सद्यानें ज्या गृहस्थास माझ्याविषयीं शिफारशीचें पत्र दिलें होतें, त्याच्या घराचा मीं लवकरच पत्ता लावून त्यास तें पत्र दिलें. त्यानें माझें फारच चांगलें आदरातिथ्य केलें. हा गृहस्थ मोठा श्रीमान् होता. याचें नांव मनोदी असें होतें. ह्यानें मला रहाण्याकरितां आपल्याच वाड्यांत एक खोली दिली; व त्या शहरांत माझा मुक्काम होता तोंपर्यंत तेथेंच माझें बिऱ्हाड होतें. सदर्हू गृहस्थानें माझी व्यवस्था फारच चांगल्या प्रकारें ठेविली.

दुसरे दिवशीं सकाळीं तो गृहस्थ मला आपल्या गाडींत घेऊन शहर दाखविण्यास निघाला. हें शहर लंडन शहराच्या निम्मे आहे. परंतु तेथील घरांची बांधणी फारच

चमत्कारिक असून तीं सर्व अगदीं मोडकळीस आलेलीं होतीं. रस्त्यांतील लोक मोठ्या लगबगीनें चालत होते, व त्यांची चर्या फारच विलक्षण दिसत होती. त्यांची नजर नेहमीं एकाच पदार्थाकडे लागलेली आहे असें दिसे, व त्यांच्यापैकीं कोणाच्याही अंगावर धड कपडा ह्मणून मुळींच नव्हता. आह्मी शहराच्या वेशींतून बाहेर पडून सुमारें दीड कोसपर्यंत रानांत गेलों. त्या ठिकाणीं पुष्कळ मजूर लोक अनेक प्रकारचीं हत्यारें घेऊन काम करीत होते. परंतु ते काय करीत होते याचा मला कांहींच उमज पडला नाहीं. तसेंच ती जमीन जरी उत्तम प्रकारची सुपीक दिसली, तरी तींत धान्य वगैरे उत्पन्न करण्याच्या हेतूनें ही सर्व खटपट चालली आहे असें कांहींच चिन्ह मला दिसलें नाहीं. या गोष्टीचें, व पूर्वी शहरांत जो विलक्षण देखावा माझ्या दृष्टीस पडला त्याचें, मला फारच नवल वाटलें. तेव्हां ही एकंदर भानगड आहे तरी काय—कीं गांवांत व रानांत जिकडे पहावें तिकडे कांहीं लोकांचा हालचाळा चालला आहे, कांहीं इकडे तिकडे पहात आहेत, व एकंदरीनें सर्वांची लगबग चालली आहे—यासंबंधानें माझी समजूत घालण्याविषयीं मीं मनोदीसाहेबांस विनंती केली. कारण वर सांगितलेल्या सर्व खटपटीच्या योगानें कांहीं एक निष्पन्न झालेलें मला दिसलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर इतकी अव्यवस्थित जमीन, अशीं खराब व गैरसोईचीं घरें, व असलीं विलक्षण तऱ्हेचीं व कंगाल मनुष्यें माझ्या कधींच पहाण्यांत आलीं नव्हतीं.

मनोदीसाहेब हे पहिल्या प्रतीचे सरदार असून ते कांहीं वर्षें लगाडो येथील गव्हर्नर होते. परंतु त्या वेळच्या प्रधानमंडळीनें त्यांच्यावर नालायकपणाचा आरोप आणून

त्यांस कामावरून हुसकून दिलें; तथापि राजाची त्यांजवर कृपा होती; कां कीं, तो त्यांस भला मनुष्य समजत असे. पण त्यांची समजूत फार कोती असें राजाचें मत होतें.

हा देश व तेथील रहिवासी लोक ह्यांची मागें लिहिल्याप्रमाणें उघड उघड नालस्ती जेव्हां मीं मनोदी साहेबांपाशीं केली, तेव्हां ते त्यासंबंधानें कांहीं एक उत्तर न करितां फक्त इतकेंच म्हणाले कीं, 'तुम्ही अद्यापि या लोकांत रुळलां नाहीं, यामुळें एकाएकीं तुम्हांस यांच्याविषयीं कोणताही अभिप्राय दर्शविणें रास्त होणार नाहीं; कां कीं, निरनिराळ्या राष्ट्रांच्या निरनिराळ्या रीतीभाती असतात.' परंतु जेव्हां आम्ही घरीं परत आलों, तेव्हां त्यांनीं मला विचारिलें, 'माझें हें घर तुम्हांस कसें काय वाटतें? यांत काय काय गैरसोई आहेत? व आमच्या या चाकरमाणसांच्या पोषाकाच्या व बोलण्याचालण्याच्या रीतीभातींत तुम्हांस कोणकोणते दोष आढळतात?' त्यांनीं मला हें विचारलें हें ठीकच. कारण त्यांचे घरची व्यवस्था फारच उत्तम प्रकारची होती. असो; मीं उत्तर केलें, 'महाराज, शहाणपणा, सद्गुण व संपत्ति, यांची आपणांस अनुकूलता असल्यामुळें, अज्ञानी व कंगाल लोकांच्या येथें जी अव्यवस्था दृष्टीस पडते, ती आपले येथें बिलकुल दिसत नाहीं.' ते म्हणाले, 'आतां तूर्त हा वाद राहूं द्या. येथून आठ दहा कोसांवर आमची शेतवाडी व एक बंगला आहे, तेथें आपण जाऊं, म्हणजे आपल्याला अशा प्रकारचें संभाषण चालविण्यास चांगली फुरसद सांपडेल.' मीं म्हटलें, 'महाराज, मजकडून कांहीं हरकत नाहीं; मी सर्वथैव आपला अंकित आहें.' इतकें झाल्यावर दुसरे दिवशीं सकाळीं आम्ही तिकडे जावयास निघालों.

आम्ही वाटेनें चाललों असतां, त्यांनीं मला शेतकरी लोक शेतांतून कसकसे काम करीत होते तें सर्व दाखविलें; परंतु मला त्यांत कांहींएक समजलें नाहीं. कारण त्या सर्व शिवारांत कांहीं थोडीं ठिकाणें खेरीज करून धान्याची किंवा गवताची काडी देखील दृष्टीस पडली नाहीं. परंतु आम्ही सुमारें तीन तास चालल्यानंतर पाहतों तों सर्व प्रकार अगदीं उलट दिसूं लागला ! जिकडे पहावें तिकडे शेतकऱ्यांच्या जवळ जवळ बांधलेल्या अशा सुबक झोंपड्या आणि कुंपण घातलेलीं छानदार शेतें दृष्टीस पडूं लागलीं. त्यांपैकीं कित्येकांत द्राक्षवेलींचे मंडप, कित्येकांत धान्य पेरिलेलें, व कित्येकांत गुरांकरितां हिरवा गार चारा, असे अनेक प्रकार दृष्टीस पडले. तो एकदर प्रदेश मला इतका कांहीं पराकाष्ठेचा रमणीय वाटला कीं, तसा आजन्म माझ्या पाहण्यांत आल्याचें मला स्मरत नाहीं. मनोदीसाहेबांस माझा चेहरा अंमळ खुललासा दिसला. तेव्हां ते म्हणाले, 'येथून पुढें तहत आमच्या बंगल्यापर्यंत सर्व जमीनजुमला माझाच आहे. मीं जी अशी आपल्या शेतकीची व्यवस्था केली आहे, ती ह्या लोकांच्या मतें अगदीं कुचकामाची असून मीं आपल्या ह्या वाईट कृतीचा लोकांस कित्ता घालून दिला म्हणून ते मला हजारों नांवें ठेवितात, व मला तोंड सुद्धां बाहेर काढूं देत नाहींत; यामुळें मी आपल्या मनांत फार खजील आहें. तथापि माझें अनुकरण फार लोकांनीं केलें आहे असें नाहीं; व ज्यांनीं केलें आहे, ते सर्व जुन्या पद्धतीचे, हेकेखोर आणि अशक्त असे आहेत !'

शेवटीं आम्ही बंगल्यांत येऊन दाखल झालों. ही इमारत मोठी भव्य असून तिची बांधणी फारच उत्तम तऱ्हेची

होती. बंगल्यासभोंवतालचे पाण्याचे पाट, बगीचे, रस्ते, व त्या रस्त्यांच्या दोहों बाजूंकडून लावलेलीं झाडें वगैरे यांची व्यवस्था फारच कुशलतेनें व सुंदर रीतीनें केलेली होती. मीं ह्या प्रत्येक गोष्टीची तिच्या योग्यतेनुरूप स्तुति



बंगला व त्याच्या भोंवतालचा देखावा. (पृ. ३८)

केली. परंतु त्यासंबंधानें मनोदीसाहेब जेवण होईपर्यंत कांहींएक बोलले नाहींत. नंतर तिसरें कोणी जवळ नाहीं असें पाहून ते दुःखाचा सुस्कारा टाकून म्हणाले, ' तुह्मी मघाशीं म्हणालां तें सर्व खरें, परंतु मला अंतर्यामीं एक काळजी उत्पन्न झाली आहे. ती ही

कीं, माझीं जीं हल्लीं घरें दारें आहेत तीं सर्व पाडून नव्या रीतीप्रमाणें मला पुनः तीं बांधलीं पाहिजेत; व हल्लींच्या सर्व शेतवाडीचा विध्वंस करून तीही नव्या रीतीप्रमाणें तयार केली पाहिजे; आणि याप्रमाणेंच मला आपल्या कुळांकडूनही करविलें पाहिजे. तसें न केल्यास, लोक मला गर्विष्ठ, तऱ्हेवाईक, लुच्चा, अडाणी आणि हेकेखोर ह्मणतील —इतकेंच नव्हे, तर कदाचित् सरकारचीही मजवर आणखी खपा मर्जी होईल—तें सर्व सोसलें पाहिजे. तसेंच तुह्मांस हल्लीं मोठा आनंद झालेला आहे, पण, मी आणखी तुह्मांस कित्येक गोष्टी सांगणार आहें, त्या तुह्मीं ऐकल्या ह्मणजे तो नाहींसा होईल. त्या गोष्टी दरबारांत तुम्हांस बहुधा कळल्यां नसतील; कां कीं, तेथील लोक आपापल्या स्वतःच्या उद्योगांत निमग्न असल्यामुळें खालीं काय चाललें आहे याचा विचार करण्यास त्यांस कोठून अवसर सांपडणार ?' मनोदीसाहेब वरील गोष्टींच्या संबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें बोलले: ते म्हणाले, 'सुमारें चाळीस वर्षांपूर्वी येथून कित्येक लोक कांहीं कामानिमित्त, किंवा मौजेखातर ह्मणा, लापुटा येथें गेले, व तेथें पांच सहा महिने राहून परत आले. ते तेथें असतां त्यांना गणितविद्या सरासरी 'ट फ' च समजू लागली; पण दुसरा एक मोठा गुण, म्हणजे स्वभावचांचल्य, हा मात्र तेथून त्यांनीं पुरा संपादन करून घेतला. मग जेव्हां ही मंडळी खालीं आली, तेव्हां त्यांना येथलें कांहींएक आवडेनासें झालें. तेव्हां त्यांनीं केलें काय, कीं येथील कला, शास्त्रें, भाषा, यंत्रविद्या वगैरे या सर्वांस नवें रूप द्यावयाचा बेत केला. हा आपला हेतु शेवटास नेण्याकरितां त्यांनीं लगाडो येथें 'युक्ति काढणारे' लोक तयार करण्यासाठीं एक महाविद्यालय स्थापन कर-

ण्याकरितां राजाचा परवाना आणिला. पुढें लागलीच हें बंड चोहोंकडे इतकें माजलें कीं, साधारण शहर ह्मटलें ह्मणजे, त्या ठिकाणीं असल्या प्रकारचें एक तरी विद्यालय



'त्या ठिकाणीं असलें एक तरी विद्यालय असतेंच.' (पृष्ठ ४०.)

असावयाचेंच. या विद्यालयांतील शिक्षक लोक, शेतकी व घरें वगैरे बांधावयाच्या संबंधानें नव्या नव्या युक्ति व नियम काढितात; तसेंच व्यापारोपयोगी व यंत्रशास्त्रासंबंधी लहान मोठीं हत्यारें तयार करण्याच्या युक्तीही ते काढितात. ते प्रतिज्ञापूर्वक सांगतात कीं, या युक्तींच्या योगानें एक मनुष्य दहा मनुष्यांचें काम करूं शकेल, व मोठी थोरली इमारत आठ

दिवसांत बांधितां येईल; फिरून तीही अशी कीं, तिला कालत्रयीं पडावयाचें भय नाहीं—इतकेंच नव्हे, तर मध्यंतरीं तिची पडझड देखील पाहण्याचें कारण पडणार नाहीं! तसेंच सर्व पृथ्वींतील फळफळावळ वाटेल त्या ऋतूंत मिळेल, व तीही हल्लींच्याहून शेंकडोंपट ज्यास्त. अशा प्रकारच्या त्यांच्या आणखी किती म्हणून वल्गना सांगाव्या? असो; येथपर्यंत हें सर्व ठीकच झालें. पण आतां राहिलें म्हणून इतकेंच कीं, त्यांच्या ह्या कल्पनांपैकीं एकही कल्पना अद्यापि सिद्ध होत नाहीं! व इकडे तर सर्व देश उजाड होत चालला आहे; लोकांच्या घरांदारांची माती होत आहे; आणि एकंदरीनें सर्वांस अन्नान्नगत झाली आहे. इतकें जरी झालें, तरी त्या लोकांची उमेद मुळींच न खचतां त्यांना आपल्या युक्ति तडीस नेण्याविषयीं ज्यास्ती ज्यास्ती स्फुरण येत आहे; व याप्रमाणें आशा व निराशा या दोहींच्या योगानें त्यांस उत्तेजनच येत आहे! आतां माझ्याविषयीं म्हणाल तर, माझ्या अंगीं धाडस नसल्यामुळें मला आपल्या पूर्वापर चालत आलेल्या रीतीच बऱ्या वाटतात; व वाडवडिलांनीं बांधिलेल्या घरांत राहून, त्यांनीं ज्या रीतीनें आपला आयुष्यक्रम चालविला तींत कोणत्याही प्रकारचा फेरफार न करितां मी तिचें अवलंबन करून राहिलों आहे; व इतर कांहीं सुशिक्षित व संभावित लोकांनींही माझ्याप्रमाणेंच चालविलें आहे. परंतु आम्हां सर्वांस इतर लोक केवळ दुष्ट समजतात, व आमचा पराकाष्ठेचा तिरस्कार करितात. ते म्हणतात कीं, ‘ हे लोक अगदीं मूर्ख व कलाकौशल्याचे द्वेष्टे आहेत. यांचें सार्वजनिक हिताकडे मुळींच लक्ष नसून, स्वतःला इकडची काडी तिकडे करायाला न पडतां चैन मात्र मारावयास पाहिजे ! ’

इतकें झाल्यावर मनोदीसाहेब म्हणाले, ' मी आतांपर्यंत बोललों हे कांहींच नाहीं. अशा आणखी हजारों गोष्टी आहेत; पण त्या मी आतां तुम्हांस सांगत नाहीं; कां कीं, तसें केल्यास, तें महाविद्यालय पाहिल्यानें जो तुह्मांस आनंद होणार आहे, त्यांत उगीच व्यत्यय येईल; व त्या ठिकाणीं तुह्मी जरूर एकवार जावेंच अशी माझी फार इच्छा आहे. हो—पण आणखी एक गोष्ट तुम्हांस सांगतों तेवढी ऐका.' असें म्हणून त्यांनीं मला पुढें लिहिलेली हकीकत सांगितली. ते म्हणाले, ' ती पहा कोसा दीडकोसाच्या अंतरावर डोंगरावरतीं एक पडकी इमारत दिसत आहे. तेथें माझी एक छानदार पाणचक्की होती. ती एका मोठ्या नदीच्या प्रवाहानें फिरत असे. तिच्या योगानें माझ्या स्वतः-च्या कुटुंबास व इतर गडीमाणसें वगैरेंस पुरे इतकें धान्य दळून निघे. परंतु सुमारें सात वर्षांपूर्वीं ह्या युक्तीवाल्यांपैकीं कांहीं लोक मजकडे येऊन मला म्हणाले, ' तुमची ही चक्की मोडून टाकून ह्या जवळच्या डोंगरावर दुसरी बांधावी, आणि या डोंगराला जो लांबच लांब कडा आहे त्यांतून एक कालवा आणावा, म्हणजे तो पाण्याचा खजिना होईल. मग त्यांतून बंबांच्या व नळयांच्या योगानें पाणी वर चढवून चक्की चालवावी. कारण उंच स्थळावरील हवेच्या योगानें पाण्यास जास्ती जोर येऊन त्या योगानें चक्कीही अधिक जोरानें फिरेल; व दुसरें असें कीं, चक्की फिरण्यास सपाट प्रदेशावरून वाहणाऱ्या पाण्यापेक्षां उंचवट्यावरून पडणारें पाणी निमे पुरतें; तेव्हां हाही तुमचा आणखी फायदाच होईल.' त्या वेळी माझा दरबारच्या मंडळीशीं बरेपणा नव्हता, व माझ्या मित्रमंडळीनेंही मला ती गोष्ट करण्याविषयीं आग्रह केला. तेव्हां सरतेशेवटीं

निरुपाय होऊन मीं त्या लोकांच्या ह्मणण्यास रुकार दिला. नंतर ह्या कामाकरितां शंभर लोक दोन वर्षेपर्यंत मीं सतत ठेविले. पुढें सांगावयास कारण काय कीं सर्वच 'ओं फस्' होऊन गेलें! व ते युक्तीवाले आपापल्या वाटांनीं निघून गेले, आणि या अपयशाचें खापर उलटें माझ्याच डोक्यावर फोडून, त्या वेळेपासून ते माझ्या नांवानें खडे फोडून राहिले आहेत! आणि इतर लोकांनाही अशाच भुलथापा देऊन खड्ड्यांत घालीत आहेत!'

पुढें थोडक्याच दिवसांनीं आम्ही लगाडो शहरास परत आलों. तेव्हां मनोदीसाहेब म्हणाले कीं, 'त्या महाविद्यालयांतील मंडळीशीं माझें बरें नसल्यामुळें मी तेथें तुमचे बरोबर येत नाहीं. तर तुमचे बरोबर मी आपल्या एका मित्रास देतों.' तथापि, 'या गृहस्थांस युक्तींचा मोठा शौक आहे, आणि हे मोठे शोधक व कोणत्याही गोष्टीवर सहज विश्वास ठेवणारे आहेत, अशी त्यांनीं तेथें माझी प्रसिद्धि करून दिली. आणि खरोखर पाहिलें तर ही गोष्ट कांहीं खोटी नव्हती; कां कीं, लहानपणीं मीही असाच युक्तीवाला होतों!

---

## प्रकरण ५.

मागील प्रकरणांत सांगितलेलें महाविद्यालय ही एकच सलग इमारत नाहीं; तर एका शेजारीं एक अशीं पुष्कळ लहान लहान घरें असून तीं एका मोठ्या रस्त्याच्या दोहों बाजूंस बांधलेलीं आहेत. सदर्हू रस्ता पूर्वीं पडित झालेला होता, तो मागें सांगितलेल्या मंडळीनें विकत घेऊन सदरील कामास लावला.

मी त्या महाविद्यालयापाशीं गेलों. तों तेथील रखवाल-

दारानें मला मोठ्या सत्कारानें आंत नेलें. मग पुढें कित्येक दिवसपर्यंत मी तेथें जात असें. तेथल्या कोठड्यांपैकीं कांहींत एकेक व कांहींत त्याहून जास्त युक्तीवाले माझ्या दृष्टीस पडले. मी ज्या खोल्या फिरलों त्यांची एकंदर संख्या पांचशेंहून कमी नसावी असा माझा अजमास आहे.

पहिल्या कोठडींत जो मनुष्य माझ्या दृष्टीस पडला, तो शरिरानें काटकुळा असून त्याचे हात व तोंड काळें कुळकुळीत झालेलें होतें. त्याची दाढी व डोक्यावरील केंस लांब होते, आणि त्याच्या कपड्याच्या सर्व चिंध्या झालेल्या असून त्याचें अंग पुष्कळ ठिकाणीं भाजलेलें होतें. त्याचा अंगरखा, बंडी, आणि शरीर या सर्वांचा रंग एकसारखाच होता. तो मनुष्य आठ वर्षेंपर्यंत एक युक्ति सिद्ध करीत होता; ती अशी कीं, काकडीपासून सूर्यकिरण उत्पन्न करून ते एका कुपींत भरून तिचें तोंड अगदीं गच्च बंद करून ठेवावयाचें, आणि गारठ्याच्या वेळेस ते किरण हवेंत उष्णता आणण्याकरितां बाहेर सोडावयाचे. हा गृहस्थ मला ह्मणाला, ‘ आणखी सुमारें आठ वर्षांत गव्हर्नर साहेबांच्या बागांना मी सूर्यकिरणांचा साधारण पुरवठा निःसंशय करीन. परंतु मला जरा पैशाची अडचण आहे. तर आपण कृपा करून या कामास कांहीं मदत केल्यास बरें होईल. तशांत आपणास मीं भीड घातली नसती, परंतु काय करावें ? यंदां काकड्यांना फारच महागाई आली आहे. ’ मीं या मनुष्याला कांहीं पैसे दिले. मनोदीसाहेबांनीं मुद्दाम या कामाकरितां मजपाशीं पैसे देऊन ठेविलेच होते; कारण कीं, या लोकांचा हा नेहमींचा भीकमाग्या स्वभाव त्यांस ठाऊक होता !

पलीकडच्या खोलींत दुसरे एक गृहस्थ होते. ते ब-

फीचें भस्म करून त्याजपासून बाराची दारू बनवीत होते. ते म्हणाले, ' आम्हीं विस्तवाच्या घनवर्धनीयतेवर एक ग्रंथ तयार केला आहे. तो छापून प्रसिद्ध करण्याचा आमचा बेत आहे. '

त्याच्या पलीकडच्या खोलींत एक परम कुशल शिल्पकार होते. त्यानीं घरें बांधण्याची एक नवीन युक्ति काढिली होती. ती अशी कीं, प्रथम आढें ठोंकून नंतर पाया खणावयाचा. ते मला म्हणाले, ' या गोष्टीविषयीं तुम्हांस आश्चर्य वाटावयास नको; कारण मधमाशा व कोळी यांचीं उदाहरणें आपल्या डोळ्यांसमोर धडधडीत आहेतचं. '

याचे पलीकडचे खोलींत जे गृहस्थ होते, ते जन्मांध होते. त्यांचे हाताखालीं त्यांच्यासारखेच कित्येक उमेदवार होते. या उमेदवारांचें काम म्हटलें म्हणजे रंग तयार करून द्यावयाचे. त्यांच्या गुरुजींनीं त्यांस हे रंग ओळखण्याची युक्ति त्या त्या रंगाच्या वासावरून व स्पर्शावरून सांगून दिली होती. परंतु माझ्या दुर्दैवानें त्या वेळीं त्या लोकांस सदरील युक्तीचा प्रयोग चांगलासा करून दाखवितां आला नाहीं, व स्वतः गुरुजींचीही लटपटच झाली ! तथापि गुरुजींच्या ठायीं त्यांच्या शिष्यवर्गाची परम पूज्य बुद्धि मला दिसून आली.

त्याच्या पलीकडच्या खोलींत जे युक्तीवाले बसले होते, त्यांनीं जमीन नांगरण्यास नांगर, जनावरें वगैरे भानगडींची जरूर न पडावी म्हणून डुकरांकडून जमीन नांगरून घेण्याची एक सोपी युक्ति काढिली होती. ती येणेंप्रमाणें:–एक एकर जमिनींत बारा बारा बोटांच्या अंतरा-

मध्यें सदरील जनावरांना फार आवडणारे पदार्थ—म्हणजे खारका व कांहीं प्रकारचीं फळें वगैरे—पुरून टाकावीं; नंतर हजार पांचशें डुकरें आणून त्या शेतांत सोडून द्यावीं; म्हणजे तीं आपल्या ह्या खाद्याच्या शोधार्थ सर्व जमीन खणून टाकतील, व त्यांच्या शेणाचें जमिनीस आयतें खतचें खतही होऊन ती पेरणीला खाशी तयार होईल. पण या कामीं खर्च व श्रम अतिशय पडून शेतही मुळींच आलें नाहीं, असें अनुभवाअंतीं त्यास कळून आलें. तथापि ही युक्ति कधींना कधीं मोठा फायदा करून देईल यांत संशय नाहीं, असें त्या युक्तीवाल्या गृहस्थांनीं बोलून दाखविलें.

नंतर पलीकडच्या खोलींत आम्ही गेलों. तेथें चोहोंकडे कोळिष्टकेंच कोळिष्टकें लोंबत होती. फक्त तेथल्या युक्तीवाल्यास तेवढी जाण्यायेण्यापुरती वाट होती. सदहू खोलींत मी जातांच तो युक्तीवाला एकदम मोठ्यानें ओरडून म्हणाला, ‘ संभाळा हो ! कोळिष्टकाला एकादा धक्का लावाल! ’ नंतर तो मला म्हणाला, ‘ अहो, जगांतले लोक आजपर्यंत केवढा मूर्खपणा करीत आले आहेत कीं, घरोघर हजारों कोळी असतांना हे रेशमाचे किड्यांचीं गरज.ठेवितात ! वास्तविक पहा बरें, कोळी हे ह्या रेशमाच्या किड्यांपेक्षां किती उपयोगाचे आहेत ! कां कीं, यांस सूत काढणें व विणणें हीं दोन्ही कामें येतात. खेरीज कोळ्यांचा आपण उपयोग करूं लागलों ह्मणजे रेशमास रंग द्यावयाचीही गरज पडणार नाहीं. ह्या पहा येथें किती चित्रविचित्र रंगांच्या माशा आहेत ! ह्या मी आपल्या कोळ्यांना खावयास घालीत असतों. तेव्हां अर्थातच कोळिष्टकांचाही रंग त्यांच्यासारखाच होईल; आणि ज्या अर्थी प्रत्येक रंगाच्या माशा आहेत, त्या

र्थी वाटेल त्या रंगाचीं कोळिष्टकें तयार होतील. आतां
ह्मी म्हणाल कीं, यांना मजबुती कशी यावी ? तर त्याची
ळींच फिकीर नको. डिंक, निरनिराळ्या प्रकारचीं तेलें,
दुसरे स्निग्ध पदार्थ माशांना खावयास घातले ह्मणजे
लें ! ' इतकें जेव्हां त्यानें उरस्फोड करून सांगितलें,
व्हां त्याची युक्ति सिद्ध होण्याचे संबंधानें मला मुळींच
का राहिली नाहीं !

याच्या पलीकडच्या खोलींत एक ज्योतिषीबावा बसले
ते. त्यांनीं, वायूच्या अनियमित गतीशीं पृथ्वी व सूर्य
ंच्या वार्षिक व दैनंदिन गतींचा मेळ बसवून, तेथील
जवाड्याच्या वायुगतिदर्शक तकटावर एक छायायंत्र बस-
ण्याची खटपट चालविली होती.

याप्रमाणें मी आणखीही कित्येक कोठड्यांत गेलों. परंतु
थें जे जे चमत्कार माझ्या दृष्टीस पडले, त्यांची हकीकत
ी देत बसत नाहीं; कां कीं, कदाचित् वाचकांस त्या भा-
डाचा कंटाळा येईल. शिवाय लिहिण्यामध्यें पाल्हाळिक
जकूर होईल तितका न आणावा असा माझा नेहमींचा
ंप्रदाय आहे.

असो; ही त्या महाविद्यालयाची एका बाजूकडील हकी-
त झाली. आतां दुसऱ्या बाजूकडील हकीकत सांगतों.
, पण विसरलों—पूर्वी सांगितलेल्या बाजूकडे एक सर्व-
ास्त्रप्रवीण महागुरु होते, त्यांच्या संबंधानें अगोदर चार
ब्द सांगणें योग्य आहे. हें झाल्यानंतर मग दुसऱ्या बा-
कडील वृत्तांतास आरंभ करूं. वरील गुरुजीबावा आम्हांस
णाले, ' मी आज सतत तीस वर्षेपर्यंत संसारसंबंधी
ोष्टींची सुधारणा करण्याच्या विचारांत आहें. ' यांच्याकडे
ीन मोठमोठाल्या खोल्या होत्या, व त्यांत नानाप्रकारच्या

वस्तूंचा संग्रह करून ठेविलेला होता. त्या ठिकाणीं पन्नास लोक काम करीत होते. त्यांपैकीं कांहींजण हवेंतून सोरा काढून घेऊन तिच्यांतील बाकीचा प्रवाही पदार्थ गाळून काढून त्याचा एक घन पदार्थ करण्याच्या कामांत गुंतले होते; कांहींजण संगमरवरी पाषाणाच्या उशा व गिरद्या करीत होते; दुसरे कित्येकजण घोड्यांना पाण्यांत बुडण्याची भीति नसावी म्हणून त्यांच्या खुरांना पाषाणाचें रूप देत होते; आणि गुरुजीबावा स्वतः दोन फारच महत्त्वाच्या युक्ति सिद्ध करण्याच्या कामांत अगदीं गढून गेले होते. त्यांपैकीं पहिली युक्ति ही कीं, जमिनींत कोंडा पेरून त्यापासून धान्य उत्पन्न करावयाचें. त्यांचें असें म्हणणें कीं, बियाचा सारा गुण काय तो कोंडयांतच असतो; व हें मला समजून देण्याविषयीं त्यांनीं फार खटपट केली; पण माझ्या डोक्यांत तें कांहींच शिरेना! असो; त्यांची दुसरी युक्ति ही कीं, निरनिराळ्या झाडांचा चीक आणि खनिज पदार्थ व वनस्पति यांचा एक रांधा बनवून तो दोन लहान लहान मेंढरांच्या अंगास लावावयाचा; म्हणजे त्या योगानें त्यांच्या अंगावरची सर्व लोंकर निघून जाऊन होतां होतां त्यापासून बिनलोंकरीचीं मेंढरें निपजावीं.

नंतर आम्हीं रस्ता ओलांडून त्या महाविद्यालयाच्या दुसऱ्या भागांत प्रवेश केला. या ठिकाणची मंडळी मानसशास्त्राचा अभ्यास करीत होती. आम्ही प्रथम ज्या कोठडींत गेलों, ती फार मोठी असून तेथें एक शिक्षक चाळीस विद्यार्थ्यांस घेऊन बसला होता. त्याचा माझा नमस्कारचमत्कार झाला, इतक्यांत तेथें एक मोठें थोरलें कपाटासारखें यंत्र होतें, त्याकडे माझें लक्ष गेलें. त्यावरून तो शिक्षक मला म्हणाला, ‘ अहो, मी व्यावहारिक व यांत्रिक

कृतीनें मानसशास्त्राची सुधारणा करीत आहें हें पाहून तुम्हांस कदाचित् आश्चर्य वाटेल. पण मी खरोखर तुम्हांस सांगतों कीं, माझ्या ह्या युक्तीच्या उपयुक्ततेविषयीं लोकांची लवकरच खात्री होईल; व तुम्ही कांहीं म्हणा, ही येवढी उत्तम व गहन युक्ति—कीं जीविषयीं आजपर्यंत कोणाच्याही मनांत मुळींच विचार आला नाहीं—ती काढल्याबद्दल मी तर आपणास धन्य समजतों. सांप्रत कलाकौशल्यें व शास्त्रें हीं शिकण्याला केवढी यातायात पडते ! आतां ही माझी युक्ति पहा किती सोपी आहे ती ! एकादा मनुष्य निव्वळ ठोंब्या जरी असला तरी त्याला अल्प श्रमानें व थोड्या खर्चानें तत्वशास्त्र, काव्य, राजनीति, धर्मशास्त्र, गणित, ब्रह्मज्ञान अशा प्रकारच्या गहन विषयांवर पाहिजे तेवढे मोठमोठाले ग्रंथ तयार करितां येतील. कारण येथें बुद्धीचें व अभ्यासाचें मुळींच प्रयोजन नाहीं.' नंतर त्यानें मला त्या वर सांगितलेल्या यंत्राजवळ नेलें; व त्याचा तो सर्व शिष्यवर्ग त्याच्यासभोंवतीं उभा राहिला. त्या यंत्राची लांबी बारा तेरा हात असून रुंदीही तितकीच होती, व तें त्या जाग्याच्या अगदीं मध्यभागीं ठेविलेलें होतें. त्याच्या कडांना लोखंडाच्या चाळीस मुठी बसविलेल्या होत्या; व त्याचें बाहेरील अंग लांकडाच्या लहान मोठ्या तुकड्यांचें केलेलें होतें. हे सर्व तुकडे फांशांच्या आकाराचे होते, व ते बारीक बारीक तारांनीं एकमेकांस जोडलेले होते. त्यांच्या प्रत्येक बाजूस कागद चिकटविलेले असून त्यांवर त्या लोकांच्या भाषेंतील सर्व शब्द लिहिलेले होते; व त्या शब्दांपुढें त्यांचे अर्थ, काळ, व विभक्तिरूपें वगैरे लिहिलेलीं होतीं. परंतु त्यांत कोणत्याही प्रकारचा अनुक्रम वगैरे नव्हता. असो; तो शिक्षक

मला म्हणाला, ‘ आतां इकडे लक्ष द्या; मी यंत्र सुरू करितों.’ त्याचा हुकूम होतांच त्याच्या शिष्यवर्गानें मागें सांगितलेल्या लोखंडाच्या मुठी हातांत धरून त्यांस एकदम हिसका दिला; तेव्हां ते सर्व शब्द इकडचे तिकडे आणि तिकडचे इकडे होऊन गेले. हें झाल्यावर त्यानें त्यांपैकीं छत्तीस जणांस, त्या यंत्रावर जशा ओळी दिसूं लागल्या तशाच हळू हळू वाचावयास सांगितल्या; आणि जेव्हां जेव्हां तीनचार शब्द एके ठिकाणीं येऊन त्यापासून कांहीं अर्थ निघे, तेव्हां ते त्या बाकीच्या चार जणांस उतरून घ्यावयास सांगत. याप्रमाणें त्यांनीं चारपांच वेळां केलें; आणि प्रत्येक वेळीं ते लांकडाचे तुकडे वर खालीं होऊन त्यापासून नवे शब्द तयार होत—अशी त्या यंत्रांत कांहीं विलक्षण हिकमत केली होती.

ते विद्यार्थी दररोज सहा तासपर्यंत हें वरील काम चालवीत असत. त्यांच्या शिक्षकानें तुटकीं तुटकीं वाक्यें लिहिलेलीं पूर्वींचीं कित्येक पुस्तकें मला दाखविलीं, आणि म्हणाला, ‘ माझा हेतु असा आहे कीं, हे सर्व लेख एकत्र करून त्यांचा एक मोठा थोरला ग्रंथ तयार करावा; म्हणजे त्यांत पृथ्वीवरील नानाविध कला व शास्त्रें या सर्वांचा समावेश होईल. हें काम याहीपेक्षां जलद व चांगलें होण्याला आणखी एका गोष्टीची अपेक्षा आहे; ती ही कीं, लोकांनीं वर्गणीनें पैसा जमवून यासारखीं आणखी पांचशें यंत्रें सुरू करावीं, आणि त्यांच्या सर्व व्यवस्थापकांनीं पूर्वोक्त रीतीनें पुस्तकें तयार करून त्या सर्वांची एक गाथा तयार करावी म्हणजे झालें. ’

त्यानें मला आणखी असें सांगितलें कीं, ‘ ही युक्ति शोधून काढण्याकरितां मी लहानपणापासून झटत आहें;

व आमच्या भाषेंतील एकून एक शब्द मीं या यंत्रांत आणिला आहे; तसेंच, ग्रंथांमधून नामें, क्रियापदें, अव्ययें आणि इतर जातींचे शब्द कोणत्या कोणत्या प्रमाणानें येतात, त्याचें अनुमान मीं अगदीं चोख बसविलें आहे.'

मीं ह्या वरील विद्वान् शिक्षकास म्हटलें, 'महाराज, आपण कृपा करून मनांत कांहीं एक न ठेवितां आपल्या सर्व गोष्टी मला सांगितल्या, येणेंकरून मी आपला फार आभारी आहें; आणि मी आपणास खात्रीपूर्वक सांगतों कीं, सुदैवेंकरून जर मी स्वदेशीं परत गेलों, तर हें अद्भुत यंत्र आपणच केवळ स्वकल्पनेनें शोधून काढिलें, अशाबद्दल मी आपली चोहोंकडे प्रसिद्धि करीन. आपण तेवढा याचा आकार आणि कृति हीं जर मला कागदावर उतरून द्याल, तर फार मेहेरबानी होईल. आतां युरोपखंडांत विद्वान् लोक हे एकमेकाच्या युक्तयांची चोरी करितात हें खरें, ( व यांत निदान इतका तरी फायदा असतो कीं, युक्तीचा खरा उत्पादक कोण आहे हें कळून येत नाहीं, ) तरी, आपल्या ह्या युक्तीच्या संबंधाचा सर्व मान आपणा एकट्यासच मिळून आपणाला कोणीही प्रतिस्पर्धी न होईल असा मी बदोबस्त ठेवीन.'

नंतर आम्ही भाषाज्ञानवर्धक मंडळीकडे गेलों. तेथें तीन शास्त्री आपली देशभाषा सुधारण्याचा विचार करीत बसले होते. त्यांची पहिली युक्ति, संक्षिप्त रीतीनें बोलण्याची होती. ती अशी कीं, अनेकपदी शब्दांचे एकपदी शब्द करावयाचे, व क्रियापदें आणि अव्ययें यांस मुळींच फांटा द्यावयाचा. कारण, वास्तविक पहातां, जेवढ्या पदार्थांचा ह्मणून मनाचे ठायीं संस्कार होतो, तीं सर्व नामेंच असतात. दुसरी युक्ति अशी होती कीं, बोलण्यामध्यें शब्दांची मुळींच

गरज न पडेल असें करावयाचें. याचा मनुष्याच्या आरोग्यास फारच उपयोग आहे असें ते लोक म्हणाले. कारण जो जो शब्द मनुष्य उच्चारतें, त्याच्या योगानें फुफु-सास कांहीं अंशीं तरी श्रम पडतात. तेव्हां अर्थातच त्या-मुळें त्याच्या आयुष्याची हानि होते, हें उघड आहे. याच्या निवारणार्थ त्यांनीं पुढील तजवीज योजिली होती. ती हीः शब्द ह्मणजे पदार्थमात्राचें नांव, हें उघडच आहे. यास्तव जेव्हां जेव्हां कोणाला एकाद्या पदार्थाविषयीं बोलावयाचें असेल तेव्हां तेव्हां शब्दाचा उच्चार न करितां तो पदार्थच आपलेबरोबर बाळगीत जावा ह्मणजे झालें. ही युक्ति सर्वत्र अमलांत आली असती तर खरोखर लोकांच्या शरीरसंप-त्तीस मोठा फायदा होऊन त्यांस फार सुख झालें असतें. पण बायका व अडाणी लोक यांनीं एकमत होऊन अशी भीति घातली कीं, ‘तुम्ही जर आमच्या वाडवडिलांप्रमाणें आह्मांस तोंडानें बोलूं देणार नाहीं, तर आम्ही बंड करूं.’ अशा अक्षरशत्रु लोकांस स्वतः अक्कल नसते, व दुसऱ्याचें-ही ते कधीं ऐकावयाचे नाहींत. असा त्यांचा स्वभाव अ-सल्यामुळें, शास्त्रें व कला यांच्या बढतीस त्यांजपासून ने-हमीं अडथळा येतो. असो; तथापि बऱ्याच विद्वान् व समंजस लोकांनीं ह्या नव्या रीतीचा स्वीकार केला आहे. परंतु ह्यांत गैरसोय ह्मणून इतकीच कीं, एकाद्या मनुष्याला एकादें मोठें काम अगर पुष्कळ प्रकारचीं कामें करावयाचीं असलीं, ह्मणजे त्याला त्या मानानें पुष्कळ जिनसांचा बोजा पाठीवर बाळगावा लागतो, किंवा त्याला ऐपत अस-ली तर एक दोन भक्कम गडी तरी या कामासाठीं ठेवावे लागतात. या प्रकारचे सुधारणाप्रिय दोन गृहस्थ मला ने-हमीं रस्त्यानें आढळत असत. ते आपलेकडील फेरीवाल्या

लोकांप्रमाणें ओझ्यानें अगदीं वांकलेलें असत. त्यांची एकमेकांची जेव्हां गांठ पडे, तेव्हां ते आपापलीं ओझीं खालीं ठेवीत, व नंतर त्यांतील गांठोडीं सोडून कित्येक तासपर्यंत वरील रीतीनें बोलत बसत. मग त्या जिनसांचीं फिरून गांठोडीं बांधून तीं एकमेकांस उचलायास लागत व नंतर सलाम करून चालते होत.

परंतु पुष्कळ बोलण्याचें काम नसलें ह्मणजे मग इतकी अडचण नसते. कारण अशा प्रसंगीं लागणारे जिन्नस बोलणाराला आपल्या खिशांत अगर काखोटीस मारून नेतां येतात; आणि घरांत असलें म्हणजे मग तर कसलीच अडचण नसते. म्हणून ज्या ठिकाणीं या कलेचा अभ्यास करण्याकरितां लोक जमतात, त्या ठिकाणीं ह्या कृत्रिम भाषणास लागणाऱ्या वस्तु अर्थात् तयारच असतात.

ह्या युक्तीपासून दुसरा एक मोठा फायदा आहे. तो असा कीं, ज्या ज्या सुधारलेल्या देशांत साधारपणें सर्व सामानसुमान सारखेंच असेल, तेथली ही सर्वसाधारण भाषा होऊं शकेल; व त्या योगें त्या त्या जिनसांचे उपयोगही सहज ध्यानांत येतील; आणि मग या रीतीनें परराज्यसंबंधी वकिलांस इतर राजांशीं तहाच्या बाबतींत वगैरे बोलणें करावयास एकमेकांच्या भाषेंतील अवाक्षर देखील न समजलें तरी कांहींएक अडचण पडणार नाहीं !

नंतर आम्ही गणितविद्येच्या शाळेंत गेलों. तेथील शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांना अशा रीतीनें पढवीत होता कीं, त्याविषयीं युरोपांत कोणास कल्पनाही होणार नाहीं ! जो सिद्धांत शिकवायाचा असेल तो व त्याची उपपत्ति हीं पातळ कागदाच्या तुकड्यावर, मस्तकशूळावर एक प्रका-

रचा पातळ द्रव केलेला असतो त्यानें लिहावयाची, व विद्यार्थ्यानें तो तुकडा अनशेंपोटीं खाऊन नंतर लागोपाठ तीन दिवस फक्त भाकरी व पाणी यांशिवाय कांहींएक खावयाचें नाहीं. पुढें तो कागदाचा तुकडा पचला म्हणजे, तो द्रव वर मेंदूंत चढून त्याच्या बरोबर सिद्धांतही वर जावयाचा. परंतु ही युक्ति अद्यापि सफळ झाली नव्हती. याचें कारण, कांहीं अंशीं वर सांगितलेला द्रव बरोबर तयार झालेला नसावा, व कांहीं अंशीं त्या पोरांचाही द्वाडपणा. त्यांना त्या द्रव्याची किळस येऊन त्याचा परिणाम होण्यापूर्वींच तीं एकीकडे जाऊन तो ओकून पाडीत. तसेंच या युक्तीस लागणारें कडकडीत पथ्यही करण्याची त्यांना अद्यापि संवय लागली नव्हती.

---

## प्रकरण ६.

नंतर आम्ही राजनीतिज्ञानवर्धक शाळेंत गेलों. तेथें मला नुसतें या, बसा, देखील कोणीं म्हटलें नाहीं. तेथले शिक्षक बिलकुल शुद्धीवरच नव्हते असा माझा तर्क झाला. या गोष्टीचें जेव्हां जेव्हां मला स्मरण होतें तेव्हां तेव्हां माझ्या मनास पराकाष्ठेचा खेद होतो. या बापड्यांच्या मनांत केवढ्या मोठमोठ्या गोष्टींचे बेत चालले होते ते पहा ! त्यांचें म्हणणें असें कीं, ‘ राजे लोकांनीं आपल्या विश्वासांतले व कृपेंतले म्हणून जे लोक पदरीं बाळगावयाचे ते शहाणे, सद्गुणी व लोकप्रिय असे असावे; प्रधान लोकांनीं नेहमीं लोकहिताचा विचार करीत जावा; गुणवान्, थोर व शूर अशा लोकांचें गुणग्रहण व्हावें; राजांनीं प्रजेचें हित तेंच आपलें हित समजून चालावें; आणि ज्या हुद्द्यास जो मनुष्य लायक असेल त्यासच त्या हुद्द्यावर नेमावें. ’

अशा प्रकारच्या अनेक भलभलत्या व असंभाव्य गोष्टींचे बेत ते करीत होते. मला वाटतें, यापूर्वी कोणाही मनुष्याच्या मनांत असल्या कल्पना आल्या नसतील; व यावरून, तत्वज्ञ लोक कोणतीही गोष्ट---मग ती कितीही अयुक्तिक अथवा अवास्तव असली तरी---खरी धरून चालले नाहींत असें नाहीं, असें लोक जें म्हणत आले आहेत, त्याविषयीं माझी या वेळीं बालंबाल खात्री झाली.

परंतु या शाळेपैकीं सर्वच लोक वरच्याप्रमाणें केवळ वाळूचें तेल काढणारे होते असें नाहीं, हें मी प्रांजलपणें कबूल करितों. यांत एक परम कुशल वैद्य होता. तो राजनीति व सृष्टिशास्त्र या दोहोंतही निपुण होता असें दिसलें. लोकांत जे नानाप्रकारचे रोग उद्भवतात, व सरकारी कामगारांच्या अंगीं लांचलुचपत घेणें वगैरे जे दुर्गुण असतात, त्यांवर या प्रख्यात वैद्यानें प्रसक्त व्यासगेंकरून उत्तम औषधें शोधून काढिलीं होतीं. ( हा लांचलुचपतीचा जो प्रकार सांगितला, यास कारण कामगार लोक दुर्गुणी असून निस्पृह नसतात हें एक, व रयत लोकांची सोदेगिरी हें दुसरें.) त्या वैद्याचें असें म्हणणें कीं, ' ज्या अर्थीं सर्व तर्कशास्त्रवेत्ते व इतर ग्रंथकर्ते यांचें असें मत आहे कीं, मानवी शरीर व राज्यरूपी शरीर यांमध्यें निकट साम्य आहे, त्या अर्थीं दोहोंतील अव्यवस्था नाहींशी करण्यास एकच उपाय चालेल. आपणांस माहीतच आहे कीं, मोठमोठ्या राजदरबारांतील लोकांस पुष्कळ प्रकारच्या व्यथा असतात; म्हणजे वातविकृति, पोटशूळ, व माथेशूळ तर फारच; खेरीज दोन्ही हातांच्या शिरा उडणें व आंखडणें; त्यांत उजव्या हाताच्या तर अतिशयच; शिवाय पांथरी, चक्कर येणें, डोकें फिरणें, गंडमाळा, करपट

ढेंकरा येणें, पोटांत आग पडणें, अन्न पचन न होणें, इत्यादि. तेव्हां या वैद्यबावांनीं अशी योजना केली कीं, जेव्हां कचेरी भरावयाची असेल, तेव्हां पहिले तीन दिवसपर्यंत कांहीं वैद्य लोकांनीं तेथें जावें, व प्रत्येक दिवशीं जो जो कांहीं वादविवाद व्हावयाचा तो झाल्यावर सर्वांच्या नाड्या पहाव्या. नंतर निरनिराळ्या रोगांच्या स्वरूपाचा, व त्यांवर कोणकोणते औषधोपचार करावयाचे त्यांचा पूर्णपणें विचार करून, चौथे दिवशीं त्या वैद्य लोकांनीं औषधांसह तेथें जावें; व ते लोक सभेंत बसण्याचे पूर्वी प्रत्येकाचा रोग पाहून त्यावर गुण पडेलसें औषध द्यावें. मग जसजसा या औषधांचा त्या रोग्यांच्या प्रकृतीवर परिणाम होईल, त्या त्या मानानें तीं औषधें दुसऱ्या कचेरीच्या वेळीं त्यांस द्यावीं, किंवा त्यांत कांहीं कमजास्त करावेंसें वाटेल तर तसें करावें; अगर मुळींच गरज नसेल तर तीं बंद करावीं.'

वरील युक्ति अमलांत आली असतां लोकांच्या अंगावर त्यापासून विशेष खर्च पडेल असें नाहीं; व मला वाटतें कीं, ज्या देशांत कायदेकानू करण्याचे कामांत लोकांचीं मतें घ्यावीं लागतात, तेथें कामाचा झट्दिशीं निकाल होण्यास तर हें विशेष उपयोगाचें साधन होईल. शिवाय यापासून लोकांत एकी वाढेल; वादविवाद थोडक्यांत आटपतील; जे थोडेसे लोक हल्लीं मुखस्तंभासारखे बसतात ते बोलावयास लागतील; व जे पुष्कळ वटवट करितात त्यांचीं तोंडें बंद होतील. तसेंच तरुण लोकांचा चारगटपणा नाहींसा होईल, व जुन्या लोकांचा हेकडपणाही जाईल; आणि सर्व लोकांस अक्कल येईल, व उच्छृंखळ लोक शांत होतील.

दरबारी लोक विसराळू फार असतात असा जो बोभाटा आहे, त्यास त्या वैद्यानें असा उपाय योजिला कीं,

'जो कोणी मनुष्य एकाद्या प्रधानाकडे कांहीं कामाकरितां जाईल, त्यानें आपल्या कामाची थोडक्यांत व स्पष्टपणें सुनावणी करून, परत जाण्याचे वेळीं त्या प्रधानास त्या कामाचा विसर पडूं नये ह्मणून त्याचे नाकास चिमटा घ्यावा, अथवा उरांत लाथ द्यावी, अगर पायावर पाय द्यावा, किंवा त्याचे तीन वेळां कान उपटावे, अथवा दंड काळानिळा होईपर्यंत त्यास चिमटा घ्यावा, व त्या कामाचा कोणता तो निकाल एकदा लागेपर्यंत प्रत्येक भेटीचे वेळीं याप्रमाणेंच करावें.'

तो आणखी असेंही म्हणाला कीं, 'राष्ट्राच्या बड्या कौन्सिलांतील प्रत्येक सभासदानें एकाद्या गोष्टीच्या संबंधानें आपलें मत दिलें, व त्या मताचें इतर गोष्टींनीं पुष्टीकरण केलें, म्हणजे शेवटीं सर्वांचीं मतें घेण्याचे वेळीं आपल्या सदरील मताच्या अगदीं उलट त्यानें आपलें मत दिलें पाहिजे कारण असें झालें असतां त्यांत लोकांचा निःसशय फायदा होईल.'

राजकारणी लोकांत कलह लागल्यास ते मिटविण्याचें त्यानें फारच विलक्षण युक्ति शोधून काढिली होती. ते अशी: 'प्रत्येक पक्षाचे शंभर लोक काढावे, व त्यांतून ज्यांच्या डोक्यांचा आकार साधारण सारखा असेल असे विरुद्ध पक्षांचे दोन दोन जण एकेका रांगेंत उभे करावे. मग उत्तम अरकशांची जोडी बोलावून त्यांजकडून त्या दोघांचें डोकीं मधोमध अशीं कापवावीं कीं, प्रत्येकाच्या डोक्यांतील मगज बरोबर विभागला जाईल. नंतर या दोन्ही छकलांची अदलाबदल करून तीं त्या दोघांच्या अर्धाल्या डोक्यांस बसवावीं.' आतां इतकें खरें कीं, हें काम अगदीं दोरीसूत झालें पाहिजे; नाहींतर त्याचा कांहींएक उपयोग

होणार नाहीं. परंतु त्या वैद्यानें सांगितलें कीं, ' तसें तें झालें ह्मणजे गुण येण्याविषयीं शंकाच नको; कारण, एकाच डोक्यांत दोन प्रकारच्या बुद्धींचा वादविवाद सुरू झाला असतां त्यांचें ऐक्य होण्यास उशीर लागणार नाहीं; आणि जे लोक असें समजतात कीं, आपलें काम जगाच्या रहाटीची देखरेख करण्याचें व त्याच्या दोऱ्या हातांत ठेवण्याचें आहे, अशा लोकांच्या अंगी जितका नेमस्तपणा व विचारशक्ति असणें इष्ट आहे, तितकी त्यांच्या ठायीं येईल.' आतां एक गोष्ट राहिली; ती ही कीं, जे कोणी आपापल्या पक्षाचे पुढारी असतील त्यांच्या बुद्धिविशिष्टत्वांत कदाचित् कांहीं फरक असेल असें कोणास वाटेल; परंतु त्याविषयीं त्या वैद्यानें स्वतःच्या अनुभवावरून सांगितलें कीं, त्याची मुळींच फिकीर बाळगावयास नको.

लोकांस त्रास न देतां त्यांजपासून पैसा उत्पन्न करण्याकरितां काय युक्ति योजावी याविषयीं दुसऱ्या दोन विद्वानांमध्यें मोठा खडाजंगीचा वाद चालला होता, तो मीं ऐकिला. त्यांपैकीं पहिला गृहस्थ म्हणाला, ' लोकांचें मूर्खत्व व दुर्गुण यांवर कर बसवावा हें रास्त आहे; व तो कर प्रत्येकावर किती बसवावा हें त्या मनुष्याच्या शेजारीं रहाणाऱ्या लोकांनीं ठरवावें.' दुसऱ्या गृहस्थाचें मत याच्या अगदीं विरुद्ध होतें. तो ह्मणाला, ' मनुष्यास ज्यांविषयीं अभिमान वाटत असेल असे जे त्याचे शारीरिक व मानसिक गुण असतील, त्यांवर कर बसवावा; व ते गुण जसजसे जास्ती अगर कमी असतील, त्या मानानें कराची रक्कम जास्ती अगर कमी ठरवावी; आणि याविषयींचा निर्णय करण्याचें काम ज्याचें त्याजवरच सोंपवावें. तसेंच चातुर्य, शौर्य, आणि सभ्यपणा यांवरही मोठमोठे

कर बसवावे; व प्रत्येक मनुष्याच्या अंगीं या गुणांपैकीं कोणता गुण किती अंशानें वसतो, हें ज्याचें त्यानेंच सांगावें. परंतु अब्रू, न्यायीपणा, विद्वत्ता आणि शहाणपणा यांवर मुळींच कर बसवूं नये; कारण हे गुण असे कांहीं चमत्कारिक आहेत कीं, कोणताही मनुष्य, ते दुसऱ्याच्या अंगीं असल्यास त्यांस मानीत नाहीं, व स्वतःच्या अंगीं असल्यास त्यांचीही त्यास किंमत नसते!'

सरकारी कामें करण्याकरितां जे लोक नेमावयाचे, ते राजपक्षाचे असावे, ह्मणून एकानें अशी युक्ति योजिली होती कीं, 'सदर्हू लोकांच्या नेमणुका ज्या करावयाच्या त्या सोडत लावून कराव्या, व सोडतींत ज्याचें नांव असेल त्यानें सोडत काढण्यापूर्वी अशी शपथ घ्यावी कीं, मी सरकारतर्फेचें मत देईन—मग माझें नांव निघो अगर न निघो. खेरीज या गोष्टीच्या बळकटीकरितां ह्मणून कांहीं ऐवज त्यानें सरकारांत अनामत ठेवावा; आणि असे केल्यावर जे कोणी हरतील त्यांचीं नांवें दुसऱ्या सोडतीच्या वेळीं घालावीं. अशा तऱ्हेनें ज्याला जागा मिळेल त्याविषयीं कांहीं भानगड राहिली नाहींच; व ज्याला न मिळेल त्याच्याही तोंडाला मध लावून ठेवल्यासारखें होईल. खेरीज अमक्यानें माझी निराशा केली असें म्हणण्यास कोणालाही जागा रहाणार नाहीं; कारण ज्याची निराशा होईल तो आपलें नशीबच खोटें असें समजेल!'

सरकारच्या विरुद्ध कोणीं कांहीं मसलत अगर कट केल्यास तो समजण्याला काय युक्ति करावी त्याचें एक टांचण दुसऱ्या एका युक्तीवाल्यानें तयार केलेलें होतें तें मला त्यानें दाखविलें. हा लेख एकंदरीनें फारच विचारपूर्वक लिहिलेला असून त्यांत राजकारस्थानी लोकांस उपयोगी

पडण्यासारख्या पुष्कळ गोष्टींची माहिती दिली होती. परंतु, माझ्या मतें यांत आणखी कांहीं गोष्टी घालण्यासारख्या आहेत, असें मीं त्या गृहस्थास सांगितलें, व तुमची मर्जी असल्यास त्या गोष्टी कोणत्या तें मी सांगतों असेंही मीं म्हटलें. त्यावरून तो ह्मणाला, 'मग तर फारच चांगलें होईल; कारण मला आणखी माहिती पाहिजेच आहे.' हें त्याचें बोलणें ऐकून मला मोठें नवल वाटलें; कारण ग्रंथकार, व त्यांतून विशेषतः युक्ति काढणारे लोक, यांना दुसऱ्याची गोष्ट बहुधा रुचणें कठिण! असो; नंतर पुढील गोष्टी मीं त्यास सांगितल्या.

मीं म्हटलें, 'पूर्वी एकदा फिरतां फिरतां मी ट्रिब्निआ प्रांतांत गेलों होतों. ( तेथील लोक त्यास लॅङ्गडन् असें ह्मणतात ) त्या ठिकाणीं कांहीं दिवस माझें रहाणें झालें होतें. तेथील बहुतेक लोकांचा धंदा ह्मटला ह्मणजे इतर लोक काय करितात, काय बोलतात, कशाविषयीं मसलती करितात, त्याचा तपास ठेवावा; व त्या संबंधानें पोलिसास वर्दी द्यावी. तसेंच लोकांच्या विरुद्ध साक्षी द्याव्या, फिर्यादी कराव्या, पुरावे द्यावे, व हव्या त्या शपथा वहाव्या. खेरीज या लोकांना आंतून मदत-करणारे आणखी पुष्कळ लोक असतातच. या सर्व लोकांस हीं कामें करण्यास तेथील प्रधानमंडळ व त्यांचे गुमास्ते हे अनुकूळ असून, त्या संबंधानें कोठें कोठें कोणकोणत्या हिकमती लढवावयाच्या हें सुद्धां तेच त्यांस सांगतात; व त्यांजकडून त्यांना या कामाबद्दल चकचकीत पगार मिळत असतो! तेथें बंडफितूर म्हणून जे काय होतात, त्यांचा वास्तविक प्रकार असा आहेः ज्यांना असें वाटत असतें कीं, आपण महान् राजकारस्थानी पुरुष आहों अशी प्रसिद्धि व्हावी, व राज्यका-

रभार पहाणाऱ्या लोकांच्या अंगचा सुस्तपणा नाहींसा होऊन त्यांच्यांत हालचाल सुरू व्हावी, लोकांत असंतोष उत्पन्न झाला असल्यास तो कसा तरी दाबून टाकावा, लोकांपासून दंडखंड घेऊन आपला तळीराम गार करावा, आणि आपल्या पथ्यास पडेल त्याप्रमाणें लोकांची कावकाव सुरू करावी, अथवा त्यांचीं मतें हाणून पाडावीं, अशा मंडळीनें आपलें कसब लढवून वरील सर्व कंत्राटें जुळविलेलीं असतात. प्रथमतः कोणकोणत्या वहिमी लोकांवर फितुरीचा आरोप आणावयाचा त्याचा या मंडळींत ठराव होतो. नंतर सदर्हू लोकांच्या हातचीं पत्रें व इतर दस्ताऐवज वगैरे मोठ्या शिताफीनें पकडून त्या लोकांच्या हातांपायांत बिड्या ठोकतात. इतकें झाल्यावर, वरील प्रकारच्या कागदपत्रांची परीक्षा करण्यात निपुण अशी एक मंडळी असते, तिच्या स्वाधीन ते कागदपत्र करितात. ते लोक, कसल्याही प्रकारचा गूढ लेख असो, त्यांतील शब्द व शब्दांतील पदें व अक्षरें वगैरे यांचे अर्थ उकलण्यांत फारच बस्ताद असतात. उदाहरण, एकाद्या ठिकाणीं ' तस्त ' असा शब्द असला, म्हणजे त्याचा अर्थ मंत्रिमंडळ असा ते करितात. तसेंच ' हंसपक्ष्यांचा थवा ' म्हणजे राजसभेंतील लोक; ' लांडा कुत्रा' म्हणजे शत्रु; ' पटकी ' म्हणजे फौज; ' बहिरी ससाणा ' म्हणजे मुख्य प्रधान; ' संधिवात ' ह्मणजे धर्माधिकारी; ' फांशीचा खांब ' ह्मणजे सरकारचा चिटणीस; ' खोलींतला ताब्या ' ह्मणजे बडे लोकांचा समाज; ' केरसुणी ' ह्मणजे राज्यक्रांति; ' उंदरांचा सांपळा ' ह्मणजे नोकरी; 'ठाव न लागणारी विहीर' म्हणजे खजिना; ' मोरी ह्मणजे दरबार; ' टोपी आणि घंटा ' म्हणजे कृपेंतला म-

नुष्य; ' मोडका बोरू ' ह्मणजे न्यायाधिकारी कोर्ट; ' रिकार्मे पीप ' ह्मणजे सेनापति; व 'पूं वहाणारें क्षत' ह्मणजे राज्यकारभार; अशा प्रकारें सर्व शब्दांचे अर्थ ते बसवितात.

' वरील रीतीनें त्या लोकांचा हेतु शेवटास गेला नाहीं, तर दुसऱ्याही आणखी कांहीं कृति त्यांजपाशीं आहेत त्या ते काढितात. त्यांपैकीं एक अशी आहे कीं, शब्दाच्या प्रत्येक अक्षराचा कांहीं तरी विवक्षित अर्थ धरावयाचा. उदाहरण, ' न ' ह्मणजे सरकारच्या विरुद्ध कट; ' व ' ह्मणजे घोडेस्वारांचें पलटण; ' ल ' ह्मणजे आरमार, इत्यादि.'

ह्या ज्या गोष्टी मीं त्या गृहस्थास सांगितल्या त्यांबद्दल त्यानें माझे फार फार आभार मानले; व ' या संबंधानें मी आपल्या ग्रंथांत तुमचे नांवाचा अवश्य उल्लेख करीन, ' असेंही तो म्हणाला.

मागें सांगितलेल्या गोष्टींखेरीज त्या देशांत दुसरें कांहींच पहाण्यासारखें नसल्यामुळें, आतां येथें राहून काय करावयाचें आहे असें मला वाटून, मीं स्वदेशीं परत यावयाचा विचार केला.

## प्रकरण ७.

एवढा वेळ ज्या राज्याचें वर्णन केलें, तें एका मोठ्या महाद्वीपांत आहे. हें महाद्वीप पासिफिक महासागराच्या उत्तरेस व कालिफोर्निया द्वीपकल्पाच्या पश्चिमेस जो अज्ञात प्रदेश आहे तेथपर्यंत पसरलेलें असावें असा माझा तर्क आहे. लगाडोपासून पासिफिक महासागर सुमारें पाऊणशें कोस आहे. त्या ठिकाणीं एक छानदार बंदर असून त्याचा लगनाग नांवाच्या विस्तीर्ण बेटाशीं मोठा व्यापार चालतो. लगनाग हें बेट वायव्य दिशेस उत्तर अक्षांश २९ व १४०

रेखांश यांचे सुमारास आहे. हें बेट जपान देशाच्या आग्नेयीस असून दोहोंमध्यें सुमारें पाऊणशें कोसांचें अंतर आहे. ह्या उभय राष्ट्रांचा पूर्ण ऐक्यभाव असल्यामुळें इकडून तिकडे व तिकडून इकडे नेहमीं जहाजें जात येत असतात. यास्तव युरोपखंडास जाऊन पोहोंचण्यास हा मार्ग ठीक आहे असें मला वाटलें. मीं आपलें सामानसुमान नेण्याकरितां भाड्याचीं दोन खेंचरें केलीं, व रस्ता दाखविण्याकरितां एक वाटाड्या बरोबर घेतला; आणि मनोदीसाहेबांचा निरोप घेऊन तेथून निघालों. आतां पुढील वृत्तांतास आरंभ करण्यापूर्वी इतकें सांगणें इष्ट आहे कीं, वरील उदार गृहस्थानें मजवर आजपर्यंत पुष्कळच उपकार केले, व शेवटीं निघतांनाही बराच ऐवज मला बक्षीस दिला.

ह्या माझ्या प्रवासांत सांगण्यासारखी कांहींएक गोष्ट घडली नाहीं. मी बंदरास जाऊन पहातों तों तेथें लगनागास जाणारें एकही जहाज मिळेना; व पुढेंही कांहीं दिवसपर्यंत मिळण्याचा संभव नव्हता. बंदराचें नांव मलडंडो असें असून तें पोर्टस्‌माउथ * बंदरायेवढें मोठें आहे. तेथल्या लोकांशीं माझी लवकरच ओळख झाली व त्यांनीं माझा चांगला आदरसत्कार केला. तेथला एक गृहस्थ मला म्हणाला, ‘ तुम्हांला लगनाग येथें जाण्याला निदान एक महिनाभर तरी जहाज मिळण्याचा रंग दिसत नाहीं. त्यास तितक्या वेळांत, येथून जवळच ग्लब्‌डब्‌ड्रिब्‌ या नांवाचें लहानसें बेट आहे, तेथली मजा पाहून याना बरे ? मी तुम्हांला एक चांगली होडी पाहून देतों, व पाहिजे असल्यास मी स्वतः व माझा मित्र असे तुमच्याबरोबर येतों. ’

---

* हें प्रसिद्ध बंदर इंग्लंड देशाच्या दक्षिण किनाऱ्यावर आहे.

हें वरील बेट मल्डंडो बंदराच्या नैर्ऋत्येस सुमारें सात आठ कोसांवर आहे. ग्लबूडबूड्रिब् या शब्दाचा अर्थ 'जादुगीर लोकांचें बेट' असा आहे. हें वाईट* नांवाच्या बेटाच्या सुमारें एक तृतीयांशायेवढें असून येथील जमीन फारच सुपीक आहे. येथें एका जातीचे लोक आहेत ते सर्व जादुगीर आहेत. त्या जातीचा जो मुख्य आहे तोच येथला राजा. त्या जातींत फक्त आपापसांत विवाहसंबंध घडतात; व सर्वांत जो कोणी वयानें मोठा असतो तो राजा होतो. राजाचा वाडा मोठा भव्य आहे. त्याचा शिकारखानाही मोठा म्हणजे तीन हजार एकरांचा असून त्याच्या सभोंवतीं चिरेबंदी भिंत सुमारें पंधरा हात उंचीची आहे. यांत गुरांकरितां कित्येक लहान लहान वाडगीं आहेत; तसेंच धान्याचीं लहान लहान शेतें व छोटे छोटे बगीचेही आहेत.

राजाच्या तैनातीस जीं माणसें असतात तीं आपण नेहमीं पहातों त्यांहून कांहीं निराळ्या प्रकारचीं असतात. राजा जादुविद्येंत मोठा वस्ताद असल्याकारणानें तो मेलेल्या माणसांपैकीं पाहिजे त्याला आपणाकडे बोलावतो, व चाहील ती कामगिरी त्यास सांगतो पण त्याचा अम्मल फक्त त्याजवर चोवीस तासपर्यंत असावयाचा, अधिक नाहीं; व पुनः तीन महिनेपर्यंत कांहीं विशेष कारणावांचून तेच ते लोक त्यास बोलावितां येत नाहींत.

दोन प्रहर दिवस येण्याला बराच अवकाश होता तों आम्ही सदहू बेटास जाऊन पोहोंचलों. मजबरोबर आलेल्यांपैकी एक गृहस्थ राजाकडे गेला, व 'कोणी दूरदेशचा मनुष्य सरकारच्या भेटीची इच्छा करीत आहे, तर त्याला

---

* हें बेट इंग्लडच्या दक्षिणेस आहे.

येण्याला परवानगी असावी,' अशी त्यानें राजास विनंती केली. ती त्यानें तत्काळ मान्य केली. तेव्हां आम्ही तिघे-जण राजवाड्यांत गेलों. राजवाड्याच्या दरवाज्याच्या आंत दोहों बाजूंस एकसारखे रांगेनें संत्री उभे होते. त्यांचीं हत्यारें व पोषाख हीं फारच विलक्षण तऱ्हेचीं होतीं; व त्यांची मुखचर्या अशी कांहीं होती कीं, त्यांजकडे पहातांच मी लटलटां कांपूं लागलों! त्या वेळीं मला जें कांहीं भय वाटलें, त्याचें वर्णनच करवत नाहीं! राजाच्या बैठकीच्या जागेपर्यंत जातांना आम्हांला कित्येक दालनें मध्यें लागलीं, त्यांतून आम्ही जात असतां पूर्वीप्रमाणेंच हत्यारबंद लोकांच्या दोन दोन रांगा आमच्या दोहों बाजूंस उभ्या असलेल्या आमच्या दृष्टीस पडल्या. राजासमोर जातांच आम्हीं त्याला मोठ्या अदबीनें तीनदां मुजरा केला. नंतर, तुम्ही कोठून व कोणीकडे आलां, वगैरे इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी विचारल्यावर त्यानें आम्हांस सिंहासनाच्या शेवटच्या पायरीपाशीं पाटावर बसावयास सांगितलें. बाल्निबार्बी येथील भाषा तेथल्या भाषेहून भिन्न आहे, तथापि राजाला ती समजत असे. त्यानें मला आपल्या प्रवासाची हकीकत सांगण्यास सांगितलें, आणि माझ्याशीं बोलतांना सभोंवतीं थाटमाट वगैरे असण्याचें कांहीं कारण नाहीं हें मला मुद्दाम दाखविण्याकरितां, त्यानें आपल्या बोटाच्या खुणेनें तेथल्या सर्व शिपाईप्याद्यांस तेथून जाण्याविषयीं हुकूम केला. तेव्हां चमत्कार काय झाला कीं, त्यानें ती खूण करतांच, ज्याप्रमाणें स्वप्नांत आपल्याला कांहीं गोष्टी दिसतात आणि जागें झाल्यावर पहावें तों कोठेंच कांहीं नाहींसें होतें, त्याप्रमाणें ते सर्व एकाएकीं अदृश्य झाले! हें पाहून कांहीं वेळपावेतों मी अगदीं बेशुद्ध

होऊन गेलों. परंतु राजा मला म्हणाला, 'तुम्ही स्वस्थ असा, तुमच्या केंसालाही धक्का लागणार नाहीं.' आणि मजबरोबरच्या दोघां गृहस्थांसही सदहू गोष्टीचें मुळींच भय वाटलें नाहीं, ( कारण त्यांनीं हे चमत्कार शेंकडों वेळां पाहिले होते, ) यामुळें मला अंमळ धीर आला, व मीं



'राजानें व आम्हीं एकाच पंक्तीस भोजन केलें.' (पृ. ६६-६७.)

राजास आपल्या प्रवासाची सर्व हकीकत थोडक्यांत सांगितली. पण ती सांगतांना पुष्कळदां मी अडखळलों, व ज्या ठिकाणीं तीं पिशाचरूपी माणसें उभीं होतीं त्या जागेकडे वारंवार वळून पाहिलें. नंतर राजानें व आम्हीं एकाच

पंक्तीस बसून भोजन केलें. तो स्वयंपाक वगैरे सर्व पिशाचांनींच तयार केलेला असून वाढप्येही त्याच प्रकारचे होते; मात्र ही मंडळी सकाळच्याहून निराळी होती. मला आतां पूर्वींपेक्षां हळूहळू भीति कमी वाटावयास लागली. मी राजापाशीं दिवस मावळे तोंपर्यंत होतों; व रात्रींही तेथेंच रहाण्याविषयीं राजानें मला आग्रह केला. पण ' येवढें कृपा करून सांगूं नका.' असें मीं त्यास म्हटलें. नंतर आम्ही तिघेजण गांवांत एके बिऱ्हाडीं जाऊन राहिलों; व दुसरे दिवशीं सकाळीं राजानें आज्ञा केल्याप्रमाणे त्याजकडे पुनः गेलों.

आम्ही दहा दिवसपर्यंत तेथें होतों. त्यापैकीं दिवसाचा बहुतेक वेळ आह्मी राजवाड्यांत असूं व रात्रीं आपल्या बिऱ्हाडीं येऊं. मीं तीं भुतें चारपांच वेळ पाहिल्यानंतर त्यांचा मला इतका सराव पडून गेला कीं, त्यांजविषयीं मला मुळींच कांहीं वाटेनासें झालें. एकादे वेळीं जरी मी मनांत चरकलों, तरी त्यांच्या संबंधानें मला जी जिज्ञासा उत्पन्न होत असे, तिजमुळें माझी सर्व भीति नाहींशी होई. ही जिज्ञासा कशाविषयीं म्हणाल तर सांगतों. राजा एकदा बोलतां बोलतां ह्मणाला कीं, ' सृष्टि उत्पन्न झाल्यापासून तों हा काळपर्यंत होऊन गेलेल्यापैकीं पाहिजेत त्या व पाहिजेत तितक्या लोकांस तुम्ही येथें बोलावा, व तुह्मांस वाटतील ते त्यांस प्रश्न करा. ते यथासांग तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें देतील मात्र इतकेंच कीं, ते लोक जितका वेळपर्यंत जगले असतील तितक्याच वेळांत घडलेल्या गोष्टींची हकीकत सांगतील.' त्यानें असेंही म्हटलें कीं, ' तुह्मांला जें काय ते सांगतील त्यांत खोटें म्हणून मुळींच असावयाचें नाहीं, कारण त्या योनींत ह्या गुणाचा कांहीं उपयोग

नाहीं.' असो; राजानें मजवर जी ही मेहेरनजर केली, तिजबद्दल त्याचे मीं फार आभार मानले.

प्रथमतः पूर्वकालीन लोकांपैकीं कोणास बोलवावें याचा मी विचार करूं लागलों. तेव्हां, मोठ्या थाटानें आणि टोलेजंग सैन्यानिशीं निघालेल्या स्वाऱ्यांचा देखावा पहाण्याची मला फार इच्छा असल्यामुळें पहिल्यानें शिकंदर* बादशाहा आरबेला§ येथील लढाई मारून आपलें सैन्य घेऊन चाललेला असा पहाण्याविषयीं मीं इच्छा प्रदर्शित केली. मग तेथें काय उशीर? आह्मी खोलींत बसलों होतों, तिच्या खिडकींतून राजाचा शिकारखाना चांगला नजरेस पडत असे, त्या ठिकाणीं, त्यानें बोट हालवितांच, शिकंदर बादशाहाची स्वारी वर सांगितल्याप्रमाणें प्रकट झाली! त्यास खोलींत बोलावलें; परंतु मला ग्रीक भाषा चांगली समजत नसल्यामुळें त्याचें बोलणें समजण्याची मला मोठी

---

* शिकंदर बादशाहा ( अलेक्झांडर दि ग्रेट ) हा ग्रीस देशांतील मासिडोनिया नामक प्रांताचा राजा होता. आजपर्यंत जगांत जे जे महान् महान् योद्धे होऊन गेले त्यांत याची गणना आहे. हा पराकाष्ठेचा मातृभक्त होता. ग्रीस देशांत आरिस्टॉटल् म्हणून जो प्रसिद्ध तत्त्ववेत्ता होऊन गेला, त्याचा हा शिष्य होता. हा देश काबीज करीत करीत हिंदुस्थानांतही आला होता. याला फक्त अरबस्थान जिंकावयाचें राहिले होतें, ते जिंकलें असतें ह्मणजे, त्या वेळीं माहीत असलेल्या सर्व जगांत त्याला कांहींएक जिंकावयाचें राहिलें नसतें. अरबस्थान जिंकण्याचीही त्यानें तयारी केली होती. पण एकाएकीं तो आजारी पडून इ० स० पूर्वी ३२३ त ह्मणजे आपल्या वयाच्या ३२ व्या वर्षी, तुर्कस्थानांतील बाबिलोन नामक शहरीं मरण पावला.

§ आरबेला हें शहर तैग्रिस नदी व कुर्दिस्थानचे पर्वत यांच्यामधील प्रदेशांत आहे. तेथें इ० स० पूर्वी ३३१ मध्यें शिकंदर बादशाहाने इराणचा राजा डरायस याशीं लढाई करून त्याचा पराभव केला.

पंचाईत पडली. त्यानें माझी खातरी करून सांगितलें कीं, 'माझ्या गळ्याशपथ मला कोणीं विषप्रयोग केला नाहीं, तर माझ्या मृत्यूचें कारण मीं मद्य फार सेवन केलें हेंच होय.'

यानंतर सेनापति हानिबॉल‡ हा आल्प्स् पहाडांतून जात आहे असा मीं पाहिला. तो मला ह्मणाला, 'माझ्या छावणींत आतां सिरक्याचा एक थेंबही उरला नाहीं.§'

† शिकंदर हा महान् योद्धा असून त्याच्या तोंडून दुसऱ्या मोठमोठ्या गोष्टी न वदवितां, फक्त 'माझ्या मृत्यूचें कारण मीं मद्य फार सेवन केलें हेंच होय' येवढेंच वदविलें, याचें सकृद्दर्शनीं नवल वाटेल; पण मद्यसेवन हें किती नाशकारक आहे हें दाखविण्याचा ग्रंथकारांचा उद्देश आहे असें मनांत आणिलें ह्मणजे त्याच्या लिहिण्यांतली खुबी तेव्हांच लक्षांत येईल.

‡ आफ्रिका खंडामध्ये इजिप्त ( मिसर ) देशाच्या पश्चिमेस जीं बार्बरी संस्थानें आहेत, त्यांपैकीं ट्युनिस नामक जें संस्थान आहे त्यांतील त्याच नांवाच्या राजधानीच्या शहरानजीक प्राचीन काळीं कार्थेज नामक मोठें प्रख्यात शहर होतें. येथें महाजनसत्ताक राज्य होतें. हें शहर घेण्याकरितां रोमन लोकांनीं बहुत लढाया केल्या, तेव्हां तें त्यांच्या हातीं लागलें. यांपैकीं कित्येक लढायांत वर सांगितलेला हानिबॉल हा सेनापति होता. हा शिकंदर बादशहाच्या जोडीचा योद्धा होता.

§ लिव्ही नामक रोमन इतिहासकारानें लिहिलें आहे कीं, 'हानिबॉल हा आल्प्स् पर्वतांतून चालला असतां एक मोठा थोरला खडक मध्यें आला, त्याच्या योगानें त्याचा रस्ता खुंटला; तेव्हां त्यानें त्यावर लांकडाचा मोठा ढीग घालवून त्याला आग लावून दिली; आणि त्या योगानें तो खडक तापला असतां त्यावर त्यानें सिरका ओतविला. असें करतांच तो खडक इतका मऊ होऊन गेला कीं, तो सहज फोडून टाकतां आला. लिव्ही याच्या लेखाच्या सत्यतेविषयीं अर्वाचीन विद्वानांना संशय वाटतो, येवढ्याचकरितां ग्रंथकारानें हानिबॉल यास येथें आणवून त्याच्या तोंडून 'माझ्या छावणींत आतां सिरक्याचा एक थेंबही उरला नाहीं, असें वदविलें आहे.

पुढें सीझर* व पॉम्पी* हे आपापल्या सैन्यांनिशीं लढाईस तयार असलेले दृष्टीस पडले. तसेंच सीझर हा शेवटची मोठी लढाई मारून विजयी होऊन आलेलाही मीं पाहिला. हें झाल्यावर रोमन लोकांची सेनेट म्हणजे राजसभा एका मोठ्या दालनांत, व अर्वाचीन काळच्या राज्यकर्त्यांची एक सभा दुसऱ्या दालनांत, अशा समोरासमोर बसलेल्या माझ्या दृष्टीस पडाव्या अशी मीं राजास विनंती केली. त्याप्रमाणें त्या सभा लागल्याच प्रकट झाल्या. पहिलींतले लोक मोठे योद्धे, व एकंदरीनें ज्यांस देवांचीच उपमा साजेल असे दिसले; व दुसरींतले जसे कांहीं फेरीवाले, उचल्ये, दरवडेखोर, आणि गरिबांगुरिबांचे काळ असे भासले !

राजानें माझ्या विनंतीवरून सीझर आणि ब्रूटस† ह्यांस

* सीझर हा महाविख्यात रोमन सेनापति होता; त्याप्रमाणेंच पॉम्पी हाही होता. हे दोघे पुरुष राज्यकारभाराचें कामांतही कुशल होते. हे प्रथम एकमेकांचे परम मित्र होते. पण पुढें कित्येक राजकारणांनीं उभयतांचे वांकडें पडून त्यांची फार्सेलिया ( ग्रीस ) येथें लढाई झाली. तीत पॉम्पी याचा पराभव झाला, व तो पळून गेला असतां कोणीएकानें त्याचा खून केला.

† हा मोठा स्वदेशाभिमानी व लोकस्वातंत्र्याविषयीं पराकाष्ठेचा झटणारा रोमन गृहस्थ होता. वर टिपेंत फार्सेलियाची जी लढाई सांगितली तींत हा पॉम्पीच्या पक्षाकडे असतां सीझरनें याचा जीव वांचविला इतकेंच नव्हे, तर त्याच्याशी मैत्री केली, व त्याला एक मोठा अधिकार दिला. पुढे सीझर याच्या पराक्रमामुळे चोहोंकडे त्याचा दरारा बसला, व रोमच्या राज्यांत त्याला सर्व सत्ताधीशत्वाचा ( Dictatorship ) अधिकार मिळाला हे सीझर याच्या शत्रूंस सहन न होऊन त्यानीं सीझर याचा जीव घेण्याचा बेत केला. ब्रूटस हा सीझर याचा मित्र होता तरी, सीझरापेक्षां मला लोकस्वातंत्र्य अधिक प्रिय आहे, असें म्हणून सीझराच्या शत्रूंस मिळाला, व त्या सर्वांनीं सीझर यास ठार मारिलें. त्यांत ब्रूटस याने स्वतः सीझर याच्या अंगावर वार केला !

माझ्यासमोर बोलाविलें. ब्रूटस ह्यास पहातांच त्याजविषयीं अत्यंत पूज्यभाव माझ्या मनांत उत्पन्न झाला. त्याचें सदाचरण, धैर्य, मनोनिग्रह, स्वदेशप्रीति आणि लोककल्याणेच्छा हीं त्याच्या मुद्रेवरूनच स्पष्ट दिसत होतीं. ब्रूटस व सीझर हे उभयतांही एकमेकांचे गुण पूर्णपणें जाणत



' सीझर आणि ब्रूटस. ' ( पृ. ७० )

होते हें पाहून मला मोठें कौतुक वाटलें. सीझरानें प्रांजळपणें कबूल केलें कीं, ' मला मारण्याच्या कीर्तीपुढें माझ्या स्वतःच्या मोठमोठ्या कृत्यांचें यश अगदीं लोपून जातें !' ब्रूटस ह्याजबरोबर माझें पुष्कळच संभाषण झालें. तो

म्हणाला, 'माझे पूर्वज, तसेंच जूनिअस,* साक्रेतिस†, इपामिनंडास‡, धाकटा केटो§, व सर टॉमस् मोअर°

---

* जूनिअस या नांवाने प्रसिद्ध असा एक परमविख्यात ग्रंथकार इंग्लंडांत होऊन गेला. त्यानें हे नांव केवळ सहीकरितां धारण केलें होतें. पण त्याचें खरें नांव अद्यापि कोणास समजलें नाहीं. 'पब्लिक अडवर्टायजर' नांवाच्या पत्रांत तो वरील सहीनें पत्रें छापवीत असे. या पत्राची भाषापद्धति उत्कृष्ट असून यांतील लेख फार निस्पृहतेनें लिहिलेले असत. यांत त्या वेळच्या बड्या बड्या मंडळीवर व खुद्द राजावरही खरपूस टीका असे. त्याचें नांव कळावें म्हणून सारें राष्ट्र जपले होतें, पण त्यानें शेवटपर्यंत कोणासही दाद दिली नाहीं. इंग्लंडांतील प्रसिद्ध वक्ते बर्क, फिलिप फ्रान्सिस् वगैरेंचा या संबंधानें लोकांस अंदेशा आला, पण त्या सर्वांनीं ती गोष्ट नाकारली. शेवटीं सांगायाची गोष्ट हीच कीं, त्याचें रहस्य त्याजबरोबरच राहून गेलें! मेकॉलेचे असें म्हणणे आहे कीं, हा फ्रान्सिसच असावा.

† साक्रेतिस हा अत्यंत निस्पृह, विद्वान्, नीतिमान् देशाभिमानी, सत्यवादी, व पराकाष्ठेचा सहनशील तत्त्ववेत्ता ग्रीस देशांत होऊन गेला. याचें चरित्र मराठींत झालें आहे तें बहुधा सर्वांच्या वाचण्यांत आलेंच असेल; सबब यांच्याविषयीं जास्त कांहीं लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

‡ इपामिनंडास हा मोठा योद्धा व राजकारणी पुरुष ग्रीस देशांत होऊन गेला. याने आपलें सर्व आयुष्य आपल्या देशाचें स्वातंत्र्य रक्षण करण्यांत घालविलें. याची सत्यावर एवढी प्रीति होती कीं, हा साऱ्या जन्मांत एकदा देखील खोटें बोलला नाहीं!

§ धाकटा केटो हा प्रख्यात रोमन सेनापति होता. हा मोठा कडक स्वभावाचा, न्यायी आणि सचोटीचा पुरुष होता. याचें जूलिअस सीझर याशीं वांकडें पडून हा त्याचें हातीं लागणार, तों अगोदरच यानें आपल्या तरवारीनें आपणास मारून घेतलें. सीझरानें त्याचें प्रेत पाहून ह्मटलें, 'केटो' तुझा जीव वांचविण्याचें यश तूं मला मिळूं दिलें नाहींस, यास्तव तुझ्यासारखा मृत्यु मला येवो असें मी इच्छितों!'

° सर टामस् मोअर हा प्रख्यात विद्वान् व राज्यकारणी पुरुष इंग्लंडांत होऊन गेला. हा रोमन क्याथोलिक पंथाचा असून मोठा

आणि मी स्वतः असे पुष्कळ वेळां एकत्र जमतों.' खरो-खर, ह्या सहाजणांच्या मेळ्यांत सातवा मिळविण्यासारखा कोणताही पुरुष कोणत्याही काळीं मिळणें नाहीं !

ह्या जगाची स्थिति निरनिराळ्या काळीं कशी होती, ती प्रत्यक्ष आपल्या नजरेस पडावी अशी मला पराकाष्टेची इच्छा असल्याकारणानें, वर सांगितल्याखेरीज आणखी शेंकडों प्रसिद्ध लोक त्या ठिकाणीं बोलविले होते. परंतु त्या सर्वांची हकीकत सांगूं लागलों तर वाचकांस कंटाळा येईल, सबब तसें करीत नाहीं. तथापि इतकें सांगणें इष्ट आहे कीं, जगाला पीडा देणाऱ्या दुष्टांचा सप्पा उडविणारे, आणि जुलमी राजांच्या त्रासापासून राष्ट्रांना सोडविणारे असे लोक पाहून मीं आपल्या नेत्रांचें समाधान करून घेतलें; व त्यापासून माझ्या मनाला इतका आनंद झाला कीं, त्याचा ठसा वाचकांच्या हृदयावर पूर्णपणें उतरेल असें त्याचें यथातथ्य वर्णन करणें अशक्य आहे!

---

## प्रकरण ८.

पुरातन काळीं जे महाविद्वान् आणि चतुरस्त्र लोक होऊन गेले, ते पहाण्याविषयीं मला इच्छा उत्पन्न झाली. यास्तव त्यासाठीं एक दिवस मुद्दाम मीं मोकळा ठेविला. मग

---

निस्पृह, स्पष्टवक्ता, व धैर्यशील होता. इग्लंडचा राजा आठवा हेन्री यानें ऍन बोलिन नामक स्त्रीशीं लग्न लाविलें ते कायदेशीर नाहीं असा यानें आग्रह धरल्यावरून याच्यावर खटला होऊन याला फांशीची शिक्षा झाली. ती यानें खुशाल पतकरिली, पण आपला शह सोडिला नाहीं !

त्या दिवशीं प्रथम होमर* आणि अरिस्टॉट्ल्† यांस त्यांच्या सर्व टीकाकारांसह पाचारण केलें. परंतु ह्या टीकाकारांचा येवढा मोठा रमणा जमला कीं, शेंकडों जणांस दरबारच्या दिवाणखान्यांत व कित्येकांस तर बाहेरच्या सोप्यांत बसावें लागलें. वर सांगितलेले दोघे महात्मे त्या एवढ्या गर्दींत असतांही मीं त्यांस सहज ओळखिलें; इतकेंच नव्हे, तर हा होमर व हा अरिस्टॉट्ल् असेंही तेव्हांच ताडलें. होमर हा अरिस्टाट्ल् ह्याजपेक्षां उंच असून त्याचा बांधा सुरेख होता. तो आपल्या काळच्या लोकांप्रमाणें ताठ चालत असे व त्याचे डोळे इतके पाणीदार आणि चपळ दिसले कीं, तसे आजपर्यंत कोणाचेही माझ्या पहाण्यांत आले नाहींत. आरिस्टॉट्ल् हा बराच वांकला होता, व त्यानें हातांत काठी घेतली होती. त्याचें शरीर रोड, केंस पातळ असून मोकळे सोडलेले, व आवाज बारीक असा होता.‡ या दोघांची त्या

* होमर हा महा प्रख्यात कवि इ० स० पूर्वी सुमारें १००० वर्षांपूर्वी ग्रीस देशांत होऊन गेला. ह्याचे अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ म्हटले म्हणजे ‘ इलियड ’ आणि ‘ ऑडेसी ’ हे होत; व ह्यांवरूनच याची विशेष प्रसिद्धि आहे. हे ग्रथ इतके उत्तम आहेत कीं, प्राचीनकाळापासून आजामितीपर्यंत त्यांची कीर्ति आहे तशीच कायम आहे.

† आरिस्टॉटल् हा महान् तत्ववेत्ता इ० स० पूर्वी सुमारें ३०० वर्षांवर ग्रीस देशांत होऊन गेला. यानें अलंकार, काव्य, राजनीति, नीतिशास्त्र, शारीरशास्त्र, गणित, तर्कशास्त्र, व अध्यात्मविचार ह्या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. महाप्रख्यात ग्रीक तत्ववेत्ता जो साक्रेतिस त्याचा शिष्य प्लेटो म्हणून होता त्याचा हा विद्यार्थी असून शिकंदर बादशाहाचा गुरु होता.

‡ अरिस्टॉट्ल् ह्याच्या ह्या वर्णनामध्यें थोडक्यांत त्याच्या ग्रंथांचें खरें स्वरूप दाखविलें आहे. कसें तर—होमरची अजरामर कीर्ति राहण्यासारखे जसे त्याचे ग्रंथ आहेत तसे याचे नसल्यामुळें

बाकीच्या मंडळींपैकीं कोणाशींही ओळख नसून त्यांनीं त्यांतून कोणासही पूर्वी पाहिलें नव्हतें, किंवा कोणाचें नांवही त्यांना नुसतें ऐकून माहीत नव्हतें. एका पिशाचानें मला असें सांगितलें कीं, 'हे टीकाकार आपल्या टीकाविषयक पुरुषांपासून नेहमीं अगदीं दूर रहातात; कां कीं, यांनीं त्याच्या ग्रंथांचे अर्थ लोकांस भलते भलते सांगून त्यांचा महान् अपराध केला असल्यामुळें यांना त्यांस तोंड दाखविण्याची शरम वाटते!' (ही वरील गोष्ट सांगणाऱ्या पिशाचाचें नांव आपण कशाला उगीच फोडावें!) डिडायमस्* आणि युस्टेथिअस् यांची होमरशीं मीं ओळख करून दिली; पण त्याला लागलेच आढळून आलें कीं, हे दोघेही कवीचें हृदय जाणण्यास सर्वथैव अयोग्य आहेत. तथापि मीं होमर यास चार गोष्टी सांगून त्यांच्या योग्यतेपेक्षां त्यांचा चांगला सत्कार करविला. परंतु अरिस्टॉटल् याला जेव्हां मीं स्कोटस्† आणि रेमस् यांची एकंदर हकीकत कळविली, तेव्हां तो संतापानें अगदीं बेताल होऊन गेला! तो त्यांना म्हणाला, 'कायहो, तुमच्या लोकांचा

---

याच्यानें ताठ उभे रहावत नाहीं असें दर्शविलें आहे. तसेच यानें हातांत काठी घेतली आहे तिचा त्याच्या टीकाकारांप्रमाणेंच त्याला उगीच थोडा टेंका मिळाला आहे; यावरून त्याचा वरील उणेपणा अधिक व्यक्त करून दाखविला आहे.

* डिडायमस् व युस्टेथिअस् यांनीं होमरच्या काव्यावर टीका केली आहे.

† स्कोटस् आणि रेमस् हे प्रसिद्ध तत्ववेत्ते फ्रान्स देशांत होऊन गेले. खरोखर पाहिलें असतां हे अरिस्टॉटल्च्या ग्रंथांवर टीका करणारे नसून यांचीं स्वतःचीं निरनिराळीं दर्शनें आहेत; इतकेंच नव्हे, तर रेमस् हा अरिस्टॉटल् त्यास अनुसरणारा नसून उलटा त्याच्या मतांशीं याचा विरोध आहे.

हा जो एवढा मोठा कळप दिसतो आहे, त्यांतील सर्वजण तुमच्याचसारखेच गाढव आहेत कीं काय ? '

ह्यानंतर मीं राजास विनंती केली कीं, ' डेका* आणि ग्यासेंडी ह्या उभयतांस बोलवावें. ' ते येतांच त्यांना मीं म्हटलें, ' कृपा करून तुम्ही आपलीं दर्शनें अरिस्टॉट्ल् ह्यास समजावून सांगा. ' तीं त्यांनीं सांगितल्यावर तो महान् तत्त्ववेत्ता ह्मणजे अरिस्टॉट्ल् प्रांजलपणें म्हणाला, 'माझ्या पदार्थविज्ञानशास्त्राच्या ग्रंथांत पुष्कळ चुका पडून गेल्या आहेत; कारण इतर लोकांप्रमाणेंच मींही निवळ अनुमानानें कित्येक गोष्टी घेऊन चाललों आहें.' परंतु तो ह्मणाला, ' ग्यासेंडी ह्यानें एपिक्यूरस† ह्याच्या मताविषयीं हवी तितकी आपल्याकडून सफाई केली आहे व डेका यानें जरी कुंठित करणारा कोटिक्रम लढविला आहे, तरी ह्या उभयतांचेही ग्रंथ अगदीं निरुपयोगी आहेत. तसेंच आकर्षणशक्ति ( जिच्याविषयीं विचार करण्याकडे अलीकडच्या विद्वान् मंडळीचें फारच लक्ष लागून राहिलें आहे) तिचीही अशीच गत होणार, हेंही तुह्मी पाहून ठेवा, ' असेंही तो बोलला. तो आणखी असें म्हणाला कीं, ' पदार्थविज्ञानशास्त्राच्या संबंधानें ज्या ज्या नव्या कल्पना लोक काढतात, ते रिकामे डौल आहेत; व ह्या कल्पना गणिताच्या आधारानें सिद्ध करून दाखविण्याचा जे आव घालतात, त्यांचें तरी काय ? दोन दिवस नवीन नवीन आहेत तोंपर्यंत त्यांची पिरपिर चालावयाची; पुढें त्यांना कोणी विचारीत देखील नाहीं !'

---

* डेका आणि ग्यासेंडी हेही प्रसिद्ध तत्त्ववेत्ते फ्रान्स देशांत होऊन गेले.

† एपिक्यूरस् हा अत्यंत प्रसिद्ध तत्ववेत्ता ग्रीस देशांत होऊन गेला. यानें एकंदर ३०० ग्रंथ लिहिले आहेत असें म्हणतात.

ह्याखेरीज आणखी पांच दिवस मीं दुसऱ्या कित्येक पुरातन काळच्या लोकांशीं संभाषण करण्यांत घालविले. त्याचप्रमाणें त्या वेळांत पहिले पहिले रोमन बादशाहा बहुतकरून सर्व पाहिले.

जे दोघे गृहस्थ मजबरोबर आले होते, त्यांना कांहीं निकडीचे कामामुळें तीन दिवसांचे आंत परत जावयाचें होतें. ह्या तीन दिवसात, माझ्या स्वतःच्या व युरोपखंडांतील इतर देशांमध्यें, गेल्या दोनतीनशें वर्षांत जे मोठमोठे प्रख्यात लोक होऊन गेले त्या सर्वांना मीं पाहून सोडलें. आणि पुरातन पिढीजाद्या घराण्यांविषयीं माझ्या मनांत नेहमीं उत्तम प्रकारचा ग्रह असल्यामुळें, वीस पंचवीस राजे व त्यांच्या आठ दहा पिढ्यांचे पूर्वज एकामागून एक असे राजाकडून मीं बोलावून आणविले. मला अशी खात्री होती कीं, ही सर्व मंडळी आपल्या मुकुट वगैरे राजचिन्हांसहित येऊन थडकेल; परंतु ह्या माझ्या अजमासाच्या संबंधानें माझी अगदीं सोळा आणे फजिती उडाली ! ! कारण एका घराण्यापैकीं दोनजण सारंगे, तीनजण झळकफळक करणारे दरबारी लोक, व एक इतालींतील पाद्री होता; आणि दुसऱ्या घराण्यांत एक हजाम, एक जोगी, व दोन कार्डिनल्* असे होते. ह्या वरील उत्तम विषयाच्या संबंधानें मीं आणखी पुष्कळ विवेचन केलें असतें, पण राजे लोकांविषयीं माझ्या मनांत नेहमीं अत्यंत पूज्यभाव असल्यामुळें मला तसें करवत नाहीं. कारण कोणाचें कांहीं, कोणाचें कांहीं, असें त्यांत उगें काढण्याचा प्रसंग

---

* ख्रिस्ती धर्माचा मुख्य अधिकारी पोप त्याच्या हाताखालीं जे सत्तर दुय्यम धर्माधिकारी असजात, त्यांना 'कार्डिनल्' असें म्हणतात.

यावयाचाच. असो; परंतु कौंट्,* मार्किस्, डयूक्, अर्ल्, वगैरेंच्या संबंधानें मीं फारशी चिकित्सा केली नाहीं. तथापि यांपैकीं कित्येक घराण्यांतल्या लोकांचे तोंडवळे त्यांच्या मूळ पुरुषांच्या तोंडावळ्यांशीं जमतातसें पाहून मला खरोखर मोठा आनंद झाला. तसेंच अमुक घराण्यांतल्या मनुष्यांच्या एकसारख्या हनवटी लांब कां, अमुक घराण्यांत एकसारखे दोन पिढ्या सोदे लोकच कां निपजले, व पुढच्या दोन पिढ्यांत अगदीं गाढव असे कां झाले, हेंही मला स्पष्ट दिसून आलें. त्याचप्रमाणें निर्दयपणा, लबाडी व भित्रेपणा ह्या आपल्या केवळ कांहीं घराण्यांच्या निशाण्याच असें म्हणण्याचा कशावरून प्रचार पडला, व फलाण्या बड्या घराण्यांत प्रथम अमुक स्पर्शजन्य रोग कोणाला झाला—कीं ज्यानें त्याच्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेची पाठ पुरविली—वगैरे सर्व मला स्पष्ट कळून आलें. पण ह्या गोष्टींचें मला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं; कां तर, त्यांच्या वंशांत मधून मधून हुजऱ्ये, शिपाईप्यादे, गाडीवान, जुवेबाज, कानफाटे, तमासगीर, शिलेदार, भामटे, अशा लोकांची भेसळ झालेली आहे असें मला कळून आलें !

मला ह्या वेळीं मुख्यत्वेंकरून अर्वाचीन इतिहासाचा अगदीं तिटकारा आला. कारण राजे लोकांच्या दरबारांतून ज्यांच्या नांवाचा डंका वाजत आहे अशा लोकांविषयीं मीं बारीक रीतीनें चौकशी करून पाहिली तों मला असें दिसून आलें कीं, ह्या जगांत लबाड इतिहासकार अतिशय भरले आहेत ! ह्यांनीं हव्या तशा खोट्यानाट्या गोष्टी लिहून अनेक लोकांच्या संबंधानें जगाचा अगदीं उलट

* ह्या इंग्लडांतील बडे लोकांच्या पदव्या आहेत.

समज करून टाकिला आहे—म्हणजे जे निव्वळ शेंदाड-शिपाई, त्यांनीं महापराक्रम केले; जे शुद्ध अकलेचे खंदक, त्यांनीं मोठमोठीं चातुर्याचीं कामें केलीं; जे केवळ खुशामत करणारे, त्यांनीं आपल्या धन्याची अंतःकरणपूर्वक सेवा केली; जे दग्यानें आपल्या देशबांधवांचे गळे कापणारे, त्यांनीं आपल्या देशांकरितां आपले प्राण खर्ची घातले; जे शुद्ध धर्मलंड, तेच ब्रह्मनिष्ठ; व जे लोकांवर व्यर्थ दोषारोप करणारे, ते धर्मराजाप्रमाणें सत्यवादी होते; अशा एक का दोन, हजारों खोट्या गोष्टी या लोकांनीं लिहिल्या आहेत! ही एक इतिहासकारांची गोष्ट झाली. शिवाय आणखी मला असें दिसून आलें कीं, न्यायाधिशांनीं लांच खाल्ल्यामुळें, व प्रधान लोकांना त्या न्यायाधिशांच्या जोरावर आपली तुंबडी भरावयास सांपडत असल्यामुळें, व लोकांत दुफळी होऊन चुरस वाढल्यामुळें, अनेक सज्जन व निरपराधी लोकांस फांशीच्या किंवा हद्दपार करण्याच्या शिक्षा होऊन गेल्या; त्याचप्रमाणें अनेक महादुष्ट चांडाळ लोकांस अत्यंत विश्वासाच्या, थोर अधिकाराच्या आणि पदवीच्या, व मोठमोठ्या पगाराच्या जागा मिळून गेल्या; त्याचप्रमाणें राजदरबारांतील कामांत ज्या कांहीं उलाढाली होत, त्यांत हांजी हांजी करणारे लुब्रे लोक आणि कावेबाज बायका, यांचा किती हात असे वगैरे सर्व गोष्टी मला पक्केपणीं समजून आल्या. आणि जगांत आजपर्यंत ज्या येवढाल्या राज्यक्रांति झाल्या, व लोकांच्या हातून जीं कांहीं मोठमोठीं धाडसाचीं कामें झालीं, त्यांत त्यांचे मूळचे हेतु कोणते होते व सदरील गोष्टी घडण्यास साधनीभूत दुसऱ्या कोणत्या नीच गोष्टी झाल्या, हें जेव्हां मला सर्व कळून आलें, तेव्हां मानवी प्राण्याचें शहाण-

पण आणि सचोटी, ह्यांविषयीं माझा ग्रह किती वाईट झाला हें सांगतांच येत नाहीं !

आणखी ह्यावरून, जे लोक ऐतिहासिक गुप्त गोष्टी लिहितात, त्यांचा अज्ञानीपणा आणि सोदेगिरी पूर्णपणें माझ्या लक्षांत आली. ती अशी कीं, हे जें लिहितात कीं, अमुक अमुक राजा विष प्राशन करून मेला, अमुक राजाचा आणि त्याच्या प्रधानाचा असा असा संवाद झाला, ( व त्या ठिकाणीं तिसरें कोणीही नव्हतें, ) तर ह्यांना तरी या गोष्टी सांगितल्या कोणीं ? तसेंच राजदरबारी वकील आणि राजे लोकांचे मुख्य चिटणीस यांच्या मनांतले बेत देखील यांना कळतात, तेव्हां हें मोठें आश्चर्य नव्हे काय ? अशा केवळ कल्पनेच्या जोरावर इमारत उठविणाऱ्या लोकांची फटफजिती व्हावी यांत नवल तें कोणतें ? आणखी सर्व जगाला आश्चर्यानें चकित करून टाकणाऱ्या अशा ज्या कित्येक गोष्टी आजपर्यंत घडून आल्या, त्यांचीही खरीं खरीं कारणें मला ह्या वेळीं समजून आलीं. एका सेनापतीनें मला असें साफ म्हणून दाखविलें कीं, ‘ मला एके वेळीं जो मोठा जय मिळाला तो निव्वळ माझ्या नादानपणानें आणि भित्रेपणानें मिळाला ! ’ एक अमीरउल्बहार* म्हणाला, ‘ मला ज्या कामावर नेमिलें होतें तें चालविण्यापुरतें माझ्या अंगीं सामर्थ्य नसतां व मी आपल्या धन्याशीं दगलबाजी करून आपलें आरमार शत्रूच्या स्वाधीन करण्याच्या बेतांत असतां माझ्या हातून शत्रूचाच

* इंग्लंडचा राजा तिसरा वुइल्यम् याच्या कारकीर्दींत लॉर्ड रसेल् म्हणून जो अमीरउल्बहार ( आडमिरल् ) होऊन गेला त्याला

उलटा पूर्ण पराजय झाला!' तिघां राजांनीं* असें साफ बोलून दाखविलें कीं, 'आम्हीं आपल्या कारकीर्दीत येथून तेथून नीतिमान् अशा एकाही पुरुषाला कसला तो अधिकार दिलाच नाहीं. ( आतां आमचा ज्यांवर विश्वास होता त्या प्रधान वगैरे लोकांच्या लुच्चेगिरीनें तसें चुकून घडलें असल्यास ती गोष्ट वेगळी. ) आणि आम्हीं पुनः राज्यपदारूढ झालों, तरी आम्ही म्हणजे तसें करूं, ही गोष्टच बोलूं नका !' ते ह्मणाले 'अहो, तुम्हांला माहीत नाहीं, राज्यकारभाराच्या कामांत ह्मटलें म्हणजे निस्पृहता, विश्वासूपणा, गंभीर स्वभाव यांचा कांहींएक उपयोग नसतो; तेव्हां तेथें नीतिमान् मनुष्य काय कामाचा ? त्याच्या अंगच्या गुणांपासून उलटा सर्व बिघाड मात्र होऊन जावयाचा ! सारांश, राज्याचे संरक्षण करण्याला शेंकडों भानगडी आणि शेंकडों लुच्चेगिऱ्या कराव्या लागतात; त्यांवांचून चालावयाचेंच नाहीं, हें तुम्ही पक्के समजा.' आणि या गोष्टींचीं कारणेंही समर्पक रीतीनें त्या राजांनीं मला सांगितलीं.

---

लक्षून वरील उपरोधोक्ति आहे. वुइल्यम् राजाशीं रसेल् याचा बरेपणा नव्हता; सबब पदच्युत झालेला राजा दुसरा जेम्स् याला पुनः गादीवर बसविण्याच्या हेतूनें, १६९२ मध्यें केप ला होग येथें इंग्लिश व डच यांची फ्रेंच लोकांबरोबर जी लढाई झाली, तींत इंग्लिशांवर उलटून पडण्याचा त्यानें बेत केला होता. पण ईश्वरी नियमानियम निराळाच होता ! तो असा कीं, रसेल् याच्या आरमारानेंच उलटा फ्रेंचांचा पराभव केला. जेम्स् राजा हा त्या वेळीं फ्रान्सच्या दरबारीं राहिला असून पुनः आपल्याला गादी मिळण्याकरितां त्यानें फ्रेंचांकडून ही लढाई करविली होती, व तो स्वतःही लढाईस आला होता.

* हे तीन राजे म्हणजे दुसरा चार्लस, दुसरा जेम्स् व तिसरा वुइल्यम् हे असावेतसें दिसतें; कारण ह्या तिघांवरही ग्रंथकाराचा मोठा कटाक्ष होता.

आजपर्यंत लाखों लोकांनीं ज्या मोठमोठ्या पदव्या व अपार संपत्ति मिळविली, ती कोणत्या रीतीनें मिळविली ह्या गोष्टीची मीं विशेष बारीक रीतीनें चौकशी केली; व ती मीं प्राचीन काळापासून तहत आजपर्यंत होऊन गेलेल्या लोकांसुद्धां जरी केली, तरी त्यांत प्रस्तुत काळच्या लोकांच्या संबंधानें फारसा कीस काढिला नाहीं. कारण स्वदेशाची गोष्ट तर दूरच राहूं द्या, पण परदेशांतील लोकांचें देखील जेणेंकरून मन दुखवेल असें कांहींएक करावयाचें नाहीं, असा माझा निश्चय होता. असो; वर सांगितलेल्या मोठमोठ्या पदव्या मिळवून व गबर होऊन गेलेले पुष्कळ लोक मीं तेथें बोलावले, व त्यांची उगीच जरा चांचणी पाहिली; तों त्यांचा मला इतका पाजीपणा दिसून आला कीं, तेणेंकरून मी अगदीं थक्क होऊन गेलों ! अहो, काय सांगावें ? त्यांनीं खोट्या साक्षी तर दिल्या, लोकांवर नानाप्रकारचे जुलूम तर केले, लांच घेतले, लोकांस ठकविलें, अशीं अनेक दुष्कर्में करून त्यांनीं आपलीं घरें भरलीं ! व ते म्हणाले, ‘ असें केल्यावांचून व्यवहारच चालावयाचा नाहीं !’ बरें, मीं म्हटलें, ‘तें असो.’ पण पुढें कित्येकजणांनीं असें सांगितलें कीं, आम्हीं तर आपला राजा व देश धुळीस मिळविला, विषप्रयोग केले, निरपराधी लोकांचा नाश करण्याकरितां न्यायाचा अन्याय केला, व अशीं हजारों कृत्यें करून आपला उत्कर्ष करून घेतला.’ पण याहीपेक्षां कित्येकांनीं आपलीं जीं कृत्यें सांगितलीं, तीं मला येथें बोलून दाखविण्याची देखील शरम वाटते ! आतां माझ्यासारख्या हलक्या प्रतीच्या मनुष्यानें ह्या वर सांगितलेल्या थोर लोकांस नेहमीं वंदन करावें हें योग्य आहे ही तर गोष्ट

खरीच, पण तसें करण्याविषयीं मला जरा शंका वाटते, त्या-बद्दल त्यांनीं मला क्षमा करावी !

पुष्कळ ठिकाणीं माझ्या वाचण्यांत असें आलें होतें कीं, अमके अमके लोक अमक्या राजांच्या आणि राष्ट्रां-च्या फारच उपयोगीं पडले; तर हे लोक कोणते ते पहावे तरी, म्हणून मीं राजास सांगून त्यांना बोलावून आण-विलें. परंतु त्यांना त्यासंबंधानें विचारपूस करीत असतां असें समजलें कीं, त्यांच्यापैकीं बहुते-कांच्या नांवाचा कोणत्याही ठिकाणीं उल्लेख केलेला नाहीं, व ज्या थोड्या बहुतांचीं नांवें कोठें कोठें आढळ-तात, ते फितुरी, महादुष्ट आणि लबाड म्हणून इति-हासांत प्रसिद्ध आहेत ! व बाकीच्यांचीं नांवें तर माझ्या कानावरून नुसतीं एकवारही गेलेलीं नव्हतीं ! ह्या सर्व लोकांच्या मुद्रा खिन्न असून त्यांचे पोषाक अगदीं हलक्या प्रतीचे होते. त्यांपैकीं बहुतेकजण म्हणाले, ‘ आम्ही द-रिद्रावस्थेंत व अपकीर्ति होऊन मरण पावलों. ’ आणि बाकीचे म्हणाले, ‘आमचीं सर्वांचीं डोकीं उडविलीं गेलीं.’

ह्या वरील लोकांत एक म्हातारा मनुष्य होता, त्याची गोष्ट मला कांहीं विलक्षण वाटली. त्याच्या जवळ एक तरणा अठरा वर्षांचा मुलगा उभा होता. तो म्हातारा म्हणाला, ‘ मी एका लढाऊ जहाजाचा कप्तान होतों, आणि अक्शियम* येथें समुद्रांत जी लढाई झाली, तींत मीं शत्रूंची फळी फोडून जाऊन त्यांचीं तीन मोठमोठीं जहाजें बुडवून टा-

* अक्शियम ( ग्रीस देशांत ) येथें इ० स० पूर्वी ३१ या वर्षीं रोमचा बादशाहा ऑगस्टस् सीझर ( जूलियस सीझर याचा दत्तक पुत्र ) याची आणि त्याचा शत्रु आंटनी म्हणून रोमन सेनापति होता त्याची लढाई झाली. तींत ऑगस्टस् यास जय मिळाला.

किलीं, व एक आपल्या हस्तगत करून घेतलें; आणि याच कारणामुळें आंटनी हा पळून जाऊन आमच्या पक्षाचा जय झाला. हा माझ्याजवळ उभा आहे हा माझा एकुलता एक मुलगा असून तो ह्या लढाईंत पडला. पुढें लढाईचा शेवट झाल्यावर मी रोम येथें गेलों, व आपली आतां लायकी बरीच आहे अशी मला खात्री वाटल्यावरून दुसऱ्या एका मोठ्या जहाजाचा कप्तान मरण पावल्याकारणानें त्याची जागा रिकामी झाली होती ती मला मिळावी म्हणून मीं ऑगस्टस् बादशाहाचे दरबारीं अर्ज केला. परंतु माझ्या हक्काकडे मुळींच कोणीं लक्ष दिलें नाहीं; व ती जागा एका अल्पवयस्क मनुष्याला मिळाली! हा मनुष्य कोण तर ऑगस्टस् याच्या राखेची कुळंबीण लायूर्बाटिना म्हणून होती तिचा मुलगा. याची लायकी कितपत होती म्हणाल, तर यानें समुद्र कसला काळा का गोरा तो पाहिला देखील नव्हता! बरें तें असो; पुढें मी आपल्या जाग्यावर परत गेलों तों असें झालें कीं, मजवर कामाची हयगय केल्याचा आरोप ठेवून मला बरतर्फ केलें, व माझी जागा पब्लिकोला म्हणून दुय्यम अमीरउल्बहार होता त्याच्या प्रीतींतील एका हुजऱ्याला दिली. तेव्हां मी रोम शहरापासून दूर एका खेडेगांवीं जाऊन राहिलों, व तेथें एका लहानशा शेतावर आपला निर्वाह करून आयुष्याचे दिवस कंठले!' ही गोष्ट ऐकून मला मोठा अचंबा वाटला. तेव्हां तिच्या खरेपणाची शहानिशा करण्यासाठीं मीं अग्रिप्पा† यास बोलावून आणविलें; कारण तो अक्शियमच्या लढाईत स्वतः अमीरउल्बहारच्या कामावर होता. तो येऊन त्यानें

---

† हा ऑगस्टस् सीझरचा जांवई होता.

वरील हकीकत बरोबर आहे म्हणून सांगितलें इतकेंच नव्हे, तर त्या कप्तानानें संकोचास्तव आपल्या पराक्रमाच्या पुष्कळ गोष्टी सांगितल्या नव्हत्या, त्या सर्व यानें सांगून त्याच्या म्हणण्यास जास्तच मजबुती आणिली!

ह्या रोमन लोकांच्या राज्यांत शेवटीं शेवटीं ऐषआराम फारच वाढल्यामुळें तेथील लोक अगदीं नीतिभ्रष्ट होऊन गेले होते; तथापि इतर देशांतही असल्या प्रकारच्या गोष्टींचें प्राबल्य किती वाढलेलें आहे, व दुराचार किती मातला आहे हें पाहून वरील गोष्टींचें मला फारसें आश्चर्य वाटलें नाहीं.

आम्हीं जे जे लोक तेथें बोलाविले ते सर्व जिवंत असतां जसे दिसत असत त्याच रूपानें त्या ठिकाणीं प्रकट झाले होते. त्यावरून अलीकडे म्हणजे गेल्या शंभर वर्षांत आपले लोक किती दुःखप्रद स्थितीस येऊन पोहोंचले आहेत हें मला ढळढळीत दिसून आलें; व तेणेंकरून माझ्या मनास अत्यंत खेद झाला. पहा, प्रत्येक घरांत रोगानें आपलें ठाणें बसविल्यामुळें लोकांच्या तोंडावरचा तजेला किती नाहींसा झाला आहे! व दिवसेंदिवस माणसें किती खुरटीं, क्षीण, फिक्कीं, व निःशक्त होत चाललीं आहेत! आमचे पूर्वींचे शेतकरी लोकच घ्या; ते किती सभ्य, त्यांचे पोषाक आणि खाणेंपिणें किती साधें; त्यांचा व्यवहार किती चोख; त्यांचा स्वतंत्रतेचा बाणा, त्यांचें शौर्य आणि स्वदेशप्रीति हीं किती वर्णनीय होतीं! ह्यांपैकीं कांहींजणांस मीं तेथें बोलावून हल्लींच्यांची पूर्वींच्यांशीं तुलना करून पाहिली, तों खरोखरच माझ्या मनाला अतिशय वाईट वाटलें. ज्यांचें वर वर्णन केलें त्याच लोकांचीं हीं नातवंडें पहा कशीं नीतिभ्रष्ट झालीं आहेत!

यांनीं कसा रोजगार मांडला आहे तो पहा ! पार्लमेंटांत लोकांची निवड होते वेळीं आपल्या मतांचा खुशाल ते विकरा करतात ! फार काय सांगावें, राजदरबारांत जितके म्हणून अनीतीचे प्रकार घडतात त्या सर्वांचा यांनीं पैशाच्या लोभानें अंगीकार करून आपल्या वाडवडिलांच्या कीर्तीची अगदीं माती करून टाकिली आहे !

---

## प्रकरण ९.

आमचा निघण्याचा दिवस येऊन ठेपला, तेव्हां मी राजाचा निरोप घेऊन आपल्या दोघां मित्रांसह मल्डंडो येथें परत आलों. नंतर सुमारें पंधरा दिवसांनीं लग्नाग् येथें जाण्याकरितां एक जहाज निघालें होतें, त्यांतच माझाही जाण्याचा बेत झाला. माझ्याबरोबरचे दोन गृहस्थ व दुसरेही कितीएकजण मिळून मला जहाजावर पोहोंचविण्याकरितां आले. या मंडळीनें कृपा करून मला वाटेची सर्व सामुग्रीही दिली.

हा माझा प्रवास सुमारें एक महिनाभर लांबला. वाटेमध्यें एक मोठें तुफान झालें, तेव्हां पश्चिमेच्या बाजूस सुमारें शंभर कोसांवर आह्मांला गलबत न्यावें लागलें; कारण हल्लीं त्या बाजूस अनुकूल वारा चालण्याची वेळ होती. आह्मी तारीख २१ एप्रिल १७०८ रोजीं क्लमेग्निग् नांवाच्या बंदरांत येऊन दाखल झालों. हें लग्नाग् बेटाच्या आग्नेय टोंकास आहे. आह्मांस बंदरापासून सुमारें कोसा दीड कोसाचे अंतरावर नांगर टाकावा लागला. कारण तेथून पुढें खडक वगैरे फार असल्याकारणानें अपघात होण्याची भीति असते. सबब आम्हीं तेथून वाटाडे लोक इशारत करून बोलाविले. तेव्हां दोन असामी सुमारें दोन

तासांत आमच्या जहाजावर आले. त्यांनीं आह्मांस नीट रस्ता दाखवून शहराच्या तटापासून अजमासें शंभर हातांवर एक खोल खाडी आहे तेथें आमचें गलबत नेलें.

आमच्या खलाशी लोकांपैकीं कांहीं जणांनीं त्या वाटाड्यांस मजविषयीं असें सांगितलें कीं, 'हा मनुष्य दूर देशचा रहाणारा असून पुष्कळ देश हिंडून आलेला आहे.' हें त्यांनीं चुकून केलें किंवा बुद्धया लुच्चेगिरीनें केलें हें कांहीं सांगतां येत नाहीं. त्या वाटाड्यांस हें समजतांच त्यांनीं तत्काळ जकातीचे नाक्यावरील कारकुनास त्याबद्दल वर्दी दिली. तेव्हां मी उतरल्याबरोबर त्या कारकुनानें माझें सर्व सामानसुमान मोठ्या बारकाईनें तपासलें. हा मनुष्य माझ्याशीं बाल्निबार्बी भाषेंत बोलला. कारण, त्या ठिकाणीं फार मोठा व्यापार चालत असल्याकारणानें पुष्कळ लोकांस ही भाषा येत असते. त्यांत मुख्यत्वेंकरून खलाशी लोक व जकातखात्यांतील कामगार यांस तर ती आल्यावांचून त्यांचें चालतच नाहीं. मीं त्या कारकुनाला आपली थोडीशी हकीकत सांगितली, परंतु त्यांत एवढें मात्र केलें कीं, ती चांगली व संभवनीय दिसेल असें तिला रूप दिलें. त्यांत मुख्यत्वेंकरून मला आपल्या देशाचें नांव अजीबात निराळेंच सांगावें लागलें. मीं त्यास सांगितलें कीं, 'मी हॉलंड देशचा रहिवासी आहें.' कारण मला आतां येथून जपान देशास जावयाचें होतें, व त्या ठिकाणीं तर डच लोकांखेरीज कोणत्याही लोकांस येण्यास परवानगी नव्हती. असो; नंतर मीं त्या कारकुनास ह्मटलें कीं, 'बाल्निबार्बी देशाच्या किनाऱ्यानजीक माझें गलबत फुटून मी एका खडकास लागलों, तेथून मला लापुटा ( उडतें बेट ) येथील लोकांनीं वर घेतलें; व आतां माझा उद्देश जपान

देशास जाण्याचा आहे. कारण, तेथून मला स्वदेशास परत जाण्यास सोईवार पडेल असें वाटतें.' तो गृहस्थ ह्मणाला, ' मी आतांचे आतांच तुमचेविषयीं हुजुरास लिहितों व त्यावर हुजूरचा हुकूम येईतोंपर्यंत तुम्हांस येथेंच राहिलें पाहिजे. हुकूम येण्यास सुमारें पंधरा दिवस लागतील. ' नंतर त्यानें मला एक चांगलें सोईकर बिऱ्हाड पाहून दिलें, व माझ्या दाराजवळ एक संत्री पहाऱ्याकरितां ठेविला. त्या बिऱ्हाडानजीकच एक मोठा बाग होता त्यांत मला खुषी वाटल्यास फिरण्याची परवानगी होती. माझ्या संबंधाचा सर्व खर्च सरकारांतून चालत असल्याकारणानें माझे तेथें सातसायास झाले. पुष्कळ लोक केवळ गमती-खातर मला भेटावयास येत असत. कारण तेथें लोकांत अशी बातमी पसरली होती कीं, ' ज्या देशाचें आपणाला नांवहीं माहीत नाहीं अशा फार दूरच्या देशाहून हा मनुष्य आलेला आहे. ' मी ज्या जहाजांत बसून येथें आलों, त्यांत एक तरुण मनुष्य मजबरोबर आलेला होता. त्यास मीं कांहीं देऊं करून आपला दुभाषी केलें. हा मनुष्य मूळचा लग्नाग् येथील रहिवासी खरा, परंतु तो मल्डोडो येथेंही बरेच दिवस राहिलेला होता; यामुळें त्यास दोन्ही ठिकाणच्या भाषा चांगल्या येत असत. याच्या साहाय्यानें, जे लोक मला भेटावयास येत, त्यांशीं मला बोलावयास सांपडे. परंतु या संभाषणांत फक्त त्या लोकांनीं मला प्रश्न विचारावे, व मीं त्यांस त्यांचीं उत्तरें द्यावीं, इतकेंच काय तें होत असे.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्या कारकुनानें माझ्या संबंधानें सरकारास जो रिपोर्ट केला होता, त्याचा जबाब नियमित वेळांत येऊन दाखल झाला. त्यांत, मला माझ्या लवा-

जम्यासह, दहा घोडेस्वार बरोबर देऊन, ट्रिल्डॉग्रिब येथें पाठविण्याविषयीं हुकूम होता. माझा लवाजमा म्हणजे काय तो फक्त मजबरोबरचा बिचारा दुभाषी—त्यालाही मोठ्या मिनतवारीनें मीं ठेवून घेतलें होतें. माझ्या विनंतीवरून त्या नाकेदारानें आह्मां दोघांस एकेक खेंचर बसावयास दिलें. आम्ही निघण्यापूर्वीं सुमारें बारा तास एक जासूद राजाकडे रवाना केला होता—इतक्याकरितांच कीं, त्यानें मी आल्याची राजास खबर देऊन, ‘ या मनुष्यानें कोणत्या दिवशीं व कोणत्या वेळेस महाराजांच्या चरणधूलीस मुखस्पर्श करावयास यावें, ’ याविषयीं राजानें त्याजपाशीं हुकूम फर्मावावा. ही केवळ दरबारी बोलण्याची रीत असावीसें मला वाटलें. परंतु पुढें पहातों तों ‘ मंत्रापेक्षां तंत्रच जास्ती ’ या ह्मणीप्रमाणें झालें ! कारण तेथें पोहोंचल्यावर दोन दिवसांनीं मला जेव्हां दरबारांत नेलें, तेव्हां मी सिंहासनाजवळ जाऊं लागतांच, ‘ तुम्हांला पोटानें फरपटत जाऊन जमीन चाटली पाहिजे’ असें तेथील लोकांनीं मला सांगितलें ! परंतु मी परस्थ असल्याकारणानें, ती जमीन अगदीं स्वच्छ केली होती, त्यामुळें मला त्यापासून त्रास झाला नाहीं. तथापि एकंदरीनें ही मेहेरनजर, मोठ्या उंच पदवीच्या लोकांसच जेव्हां राजाच्या भेटीस जावयाचें असतें, तेव्हां त्यांच्यावर मात्र होते. ह्याच्या उलट केव्हां केव्हां असेंही घडतें कीं, त्या जमिनीवर बुद्धिपुरःसर माती पसरून ठेवितात ! परंतु अशी गोष्ट, जर त्या भेटीस येणाऱ्या गृहस्थाचे कोणी वैरी राजदरबारांत असले, तरच होते. मीं त्या दरबारांत एक बडा मनुष्य पाहिला, तो जेव्हां वर सांगितल्याप्रमाणें जमीन चाटण्याचा विधि करून राजापुढें उभा राहिला, तेव्हां त्याच्या तों-

डांत धूळ इतकी गेली होती कीं, त्याला बोलतां सुद्धां येईना ! कारण जे राजाचे भेटीस येतात, त्यांनीं त्याचे



'पोटानें फरपटत जाऊन जमीन चाटली.' (पृ. ८९).

समोर थुंकतां किंवा तोंड पुसतां कामा नये. तसें केल्यास त्या अपराधास देहदंडाखेरीज दुसरें शासन नाहीं !

ह्या दरबारची आणखी एक विलक्षण चाल मीं पाहिली, ती तर मला अगदींच पसंत पडली नाहीं. ती ही कीं, जेव्हां राजाच्या मनांत एकाद्या बड्या मनुष्यास सौम्य रीतीनें देहान्तशिक्षा द्यावयाची असते, तेव्हां एक उदी रंगाची विखारी भुकटी त्या ठिकाणीं पसरून

ठेवितात; मग त्या मनुष्याकडून ती चाटवितात, म्हणजे तो चोवीस तासांचे आंत खात्रीनें मरतो. परंतु या राजास आपल्या प्रजेच्या जिवाविषयीं फारच काळजी आहे यांत संशय नाहीं; व या गोष्टींत तर युरोपखंडांतील राजांनीं त्याचा कित्ता घ्यावा असें मला वाटतें. त्याच्या दयाळुत्वाचें एक उदाहरण सांगण्यासारखें आहे तें असें कीं, हा वर सांगितलेला देहान्तशिक्षेचा प्रकार जेव्हां घडून येतो, तेव्हां ज्या ठिकाणीं ती विखारी माती टाकिलेली असेल ती जागा धुऊन अगदीं साफ करण्याविषयीं नोकर लोकांस सक्त ताकीद असते; व जो या कामीं हयगय करील त्यावर राजाची फारच इतराजी होते. एकदा वर सांगितलेली शिक्षा अमलांत आली असतां, ती जमीन स्वच्छ करण्याविषयीं हुकूम देण्याची त्या दिवशीं ज्या मनुष्याची पाळी होती त्यानें दुष्ट बुद्धीनें तसें केलें नाहीं; व त्यामुळें एक मोठ्या पदवीचा होतकरू मनुष्य राजाचे भेटीस आला असतां ती जमिनीवर पसरलेली विखारी माती चाटल्याच्या योगानें तो मरण पावला, व त्यास मारावें असा राजाचा मुळींच हेतु नव्हता. तेव्हां राजानें त्या नोकरास चकचकीत फटके मारण्याचा हुकूम केला. परंतु त्यानें, यापुढें सरकारचे हुकमाखेरीज मी असें कधींही करणार नाहीं, असें म्हणतांच राजानें दयावंत होऊन त्यास क्षमा केली.

असो, विषयांतर झालें. मी पूर्वीं सांगितल्याप्रमाणें फरपटत फरपटत जाऊन सिंहासनापासून सुमारें सात आठ हातांवर पोहोंचल्यावर मोठ्या अदबीनें गुडघे टेंकून बसून सात वेळां जमिनीला डोकें लाविलें. मग मला आदले दिवशीं रात्रीं त्यांच्या भाषेंतले कांहीं शब्द शिकवन

ठेविले होते ते मीं ह्मटले. त्यांचा अर्थ, 'देवलोकवासी श्रीमन्महाराज यांना चंद्र व सूर्य यांपेक्षांही जास्ती आयुष्य होवो,' असा होता. ज्या ज्या मनुष्यास राजाच्या भेटीस जावयाचें असेल त्यानें हा सलामीचा मंत्र ह्मटला पाहिजे असा त्या देशचा कायदा आहे. मीं हा मंत्र ह्मटल्यावर राजानें त्यावर कांहीं उत्तर दिलें; परंतु मला त्यांत कांहींच समजलें नाहीं. तथापि मला पूर्वीं सांगून ठेविल्याप्रमाणें मी ह्मणालों, 'महाराज, माझी जीभ माझे मित्राचे तोंडांत आहे.' ह्या माझ्या बोलण्याचा भाव असा होता कीं, राजानें मला आपल्या दुभाष्यास बोलावण्यास परवानगी द्यावी. त्यावरून त्या दुभाष्यास तेथें आणविलें. मग त्याच्या द्वारें राजाचें व माझें तास दीड तासपर्यंत संभाषण झालें. मी बाल्निबार्बी भाषेंत बोलें, व त्याचा अर्थ तो दुभाषी लग्नाग्चे भाषेंत राजास सांगे.

माझ्या सहवासानें राजास फारच आनंद झाला. त्यानें आपल्या खाजगीकडील मुख्य कारभाऱ्यास हुकूम केला कीं, 'यास व याच्या दुभाष्यास दरबारांतच रहाण्यास जागा द्यावी, व यांस भोजनखर्चाचीही नेमणूक करून द्यावी; आणि किरकोळ खर्चाकरितां पांचशें रुपयांची एक थैली यांच्या स्वाधीन करावी.'

मी या देशांत तीन महिने राहिलों, व राजाच्या आज्ञेप्रमाणें सर्व गोष्टी केल्या. तेव्हां त्याची मजवर फारच मर्जी बसली, व 'तुह्मी येथें राहिल्यास मी तुमची चांगली बढती करीन,' असें त्यानें मला पुष्कळ सांगितलें; परंतु आतां राहिलेले दिवस आपल्या मुलांमाणसांत घालविणें हेंच श्रेयस्कर आहे असें मला वाटलें.

---

## प्रकरण १०.

लग्नाग् येथील लोक मोठे सभ्य व थोर मनाचे आहेत; पण किंचित् अभिमानी आहेत. तथापि त्यांना त्याबद्दल फारसा दोष देतां येत नाहीं; कां कीं, प्राच्य देशांतील लोकांचें तें ब्रीदच पडलें! पण एकंदरीनें लग्नाग् येथील लोकांना परस्थ लोकांची चाड मोठी यांत संशय नाहीं; आणि त्यांतून जर एकाद्यावर तेथल्या राजाची कृपादृष्टि झाली, तर मग त्या मनुष्याला ते पराकाष्ठेचेंच भजतात. माझी तेथें बड्याबड्या लोकांत बरीच ओळखपाळख झाली होती; व मजबरोबर नेहमीं एक दुभाषी असे, यामुळें त्या लोकांशीं मला चांगल्या चांगल्या विषयांवर पुष्कळ संभाषण करावयास सांपडे.

एके दिवशीं कांहीं मंडळींचें व माझें बोलणें चाललें असतां, एका विद्वान् गृहस्थानें मला विचारिलें, 'अहो, तुह्मीं आमचे येथील अमर लोक पाहिले आहेत काय?' या त्याच्या प्रश्नाचें मला मोठें आश्चर्य वाटून मीं ह्मटलें, 'तुह्मीं मर्त्यांस अमर ह्मणतां याचा मला कांहींच अर्थ कळत नाहीं! तर मेहेरबानी करून या गोष्टीचें मला स्पष्टीकरण करून सांगा.' तो गृहस्थ ह्मणाला, 'आमच्या देशामध्यें एकाद्या कुटुंबांत कधीं कधीं असें मूल निपजतें कीं, त्याच्या कपाळावर ह्मणजे डावे भिंवईचे वरचे अंगास, एक वाटोळा तांबडा चट्टा असतो; व असा चट्टा असला ह्मणजे तें मूल अमर असें समजावयाचें. परंतु अशीं मुलें फारच क्वचित् जन्मतात. तो कपाळावरचा चट्टा प्रथमतः सुमारें पावलीएवढा मोठा असतो; पण पुढें दिवसेंदिवस तो वाढत जाऊन त्याचा रंगही बदलतो. तो असा कीं, बारावे वर्षीं तो हिरवा होतो, व तसाच पंचवीस वर्षें

असलीं पाहिजेत. असो; पण दरबारांत असला एकही मनुष्य माझ्या पाहण्यांत आला नाहीं याचें मला मोठें आश्चर्य वाटतें; कारण, यांचे कपाळावर जो काळा चट्टा असतो तो अगदीं सहज ध्यानांत येण्यासारखा आहे. तुमचे राजेसाहेब अत्यंत सुज्ञ व विचारी असून त्यांनीं आपल्या प्रधानमंडळांत असले लोक ठेविले नसतील असें संभवत नाहीं. तथापि अशी गोष्ट असलीच तर तिचें कारण मला असें दिसतें कीं, या परमसद्गुणी लोकांच्या स्वभावास राजदरबारांतील लांड्यालबाड्या व सोदेगिऱ्या अगदीं खपत नसतील, यामुळें तेच होऊन तो व्याप पतकरीत नसतील, किंवा तरुण लोकांचा स्वभाव साधारणतः फार चंचळ व दुराग्रही असल्यामुळें त्यांस विचारी व शांत मनुष्यांचें बोलणें पसंत पडत नाहीं अशीं शेंकडों उदाहरणें दृष्टीस पडतात, या कारणास्तव या लोकांचा तेथें रिवाव नसेल. हें कसेंही असो, पण राजेसाहेबांनीं मला पाहिजे तेव्हां आपलेकडे येण्याची परवानगी दिलीच आहे, त्या अर्थी यापुढें त्यांची भेट होतांच प्रथम या लोकांविषयीं मी आपलें मत स्पष्टपणें त्यांस प्रदर्शित करीन; आणि माझें म्हणणें त्यांस रुचो अगर न रुचो, तथापि एक गोष्ट मात्र मीं केल्याशिवाय रहाणार नाहीं; ती ही कीं, ते जे मला नेहमीं म्हणतात कीं, तुम्हांस मी येथेंच कांहीं सोय लावून देतों, तें कबूल करून आयुष्याचे राहिलेले दिवस याच ठिकाणीं काढीन, व त्या अमर लोकांनीं कृपा करून मला आपल्या सहवासांत घेतल्यास त्यांच्याशीं संभाषण करण्यांत वेळ घालवीन.’

मीं आपले हे सर्व विचार ज्या गृहस्थास कळविले, त्यास बाल्निबार्बी येथील भाषा येत होती हें मागें सां-

गितलेंच आहे. तो किंचित् हांसून म्हणाला, ' तुम्हांस त्या अमर लोकांमध्यें नेऊन ठेवण्याची पाहिजे त्या वेळीं मी तजवीज करीन. पण तुम्ही आतां काय बोललां हें या मंडळीस सांगण्याची तेवढी मला परवानगी द्या. ' मी बरें म्हणतांच त्यानें माझें सर्व बोलणें त्यांस समजावून दिलें. त्यावरून ते आपापसांत बराच वेळपर्यंत बोलत होते. परंतु त्यांतील एक अक्षरही मला समजलें नाहीं; व माझें बोलणें त्यांस कितपत रुचलें वगैरेही त्यांच्या मुखचर्येवरून कांहीं समजलें नाहीं. नंतर थोडक्या वेळानें तो पहिला गृहस्थ मला म्हणाला, ' अमरत्वापासून होणाऱ्या सुखांच्या संबंधानें जें तुह्मीं यथायोग्य भाषण केलें तें ऐकून या मंडळीस फारच आनंद झाला आहे. तर आतां यांचें एवढेंच ह्मणणें आहे कीं, जर सुदैवानें तुम्हींच अमर झालां असतां तर तुम्हीं आपलें आयुष्यक्रमण कोणत्या तऱ्हेनें केलें असतें तेवढें आह्मांस सांगा. ' मीं म्हटलें, ' अशा महत्वाच्या व आनंददायक विषयावर संभाषण करणें फारसें कठिण नाहीं; आणि माझ्या सारख्यास तर तें अगदींच कठिण नाहीं. कारण मी जर राजा किंवा सेनापति किंवा एकादा बडा मनुष्य झालों असतों तर काय केलें असतें, अशा प्रकारच्या गोष्टींविषयीं नेहमीं माझे विचार चाललेले असतात. तसेंच या सांप्रतच्या विषयावरही, म्हणजे जर मी खरोखर अमर झालों असतों तर काय काय केलें असतें, व कोणकोणत्या कामाकडे कसकसा आपला वेळ खर्च केला असता, याविषयींही मी नेहमीं विचार करीत असतों.

' या जगांत अमर होऊन येण्याचें जर माझ्या दैवीं असतें, तर अक्षय्य जीवित व मृत्यु यांत काय भेद आहे, व अक्षय्य जीवितापासून आपणास किती सुख आहे हें मला समजूं

लागतांच, हरतऱ्हेनें अगोदर संपत्ति मिळविण्याचा मीं निश्चय केला असता. ह्मणजे सुमारें दोनशें वर्षेंपर्यंत काटकसरीनें व व्यवस्थेनें राहून, सर्व राष्ट्रांत मी श्रीमान् झालों असतों यांत संशय नाहीं. दुसरें, अगदीं लहानपणापासून सर्व शास्त्रें व कला यांचा मीं अभ्यास केला असता; म्हणजे कालेंकरून सर्वांहून मी विद्वान् झालों असतों; आणि शेवटीं असें केलें असतें कीं, लोकांत घडलेली प्रत्येक महत्वाची गोष्ट जशीची तशी मोठ्या काळजीनें लिहून ठेविली असती; आणि एकामागून एक झालेले राजे व प्रधान यांच्या चालचलणुकीचें निष्पक्षपातानें वर्णन करून, प्रत्येक मुद्याच्या गोष्टीवर आपले स्वतःचे विचार ठिकठिकाणीं प्रदर्शित केले असते. त्याचप्रमाणें लोकरीति, भाषा, पेहराव, जेवणाखाणाच्या रीति व मनोरंजनाच्या गोष्टी, यांमध्यें नेहमीं जे फेरफार होतात, ते सर्व अगदीं बरोबर रीतीनें लिहून ठेविले असते. अशा प्रकारें सर्व गोष्टींचें ज्ञान संपादिल्यामुळें मी ज्ञानाचें केवळ भांडारच बनून गेलों असतों; आणि असें झाल्यावर मग मी सर्व राष्ट्रांचें केवळ चालतें बोलतें दैवतच झालों असतों !

‘ एकदा साठी उलटल्यावर मग मीं लग्न मुळींच केलें नसतें, आणि आपला सर्व काळ लोकांचें आगतस्वागत करण्यांत व त्यांचा परामर्श घेण्यांत घालविला असता. तथापि खर्च बेताबातानेंच केला असता; तरुण व होतकरू अशा लोकांबरोबर नेहमीं संभाषण करून त्यांचीं मनें सुमार्गाकडे वळविलीं असतीं; आणि खाजगी व सरकारी कामांत नीतीनें वागण्याची किती आवश्यकता आहे याविषयीं मीं आपल्या स्वतःच्या स्मरणांतल्या गोष्टींवरून, अनुभवावरून व अवलोकनावरून त्यांची खात्री करून दिली

असती. परंतु मीं आपले नेहमींचे जिवश्चकंठश्च स्नेही म्हटले ह्मणजे आपल्यासारखेच दहाबारा अमर लोक केले असते. त्यांची निवड अशी केली असती कीं, त्यांमध्यें सर्वांत वयस्क मनुष्यापासून तों माझ्या बरोबरीच्या वयापर्यंतचे सर्वजण यावे. यांपैकीं कोणास कालेंकरून दरिद्रावस्था प्राप्त झाल्यास मीं आपल्या शेतवाडीच्या शेजारींच त्यांना झोंपड्या वगैरे बांधून देऊन त्यांची सर्व सोय करून दिली असती; व कित्येकांस मीं आपल्या पंक्तीस नेहमीं घेतलें असतें. तुह्मां नाशवंत मनुष्यांपैकीं थोड्याशा निवडक लोकांस मात्र मीं आपल्या मंडळींत घेतलें असतें; व तुमच्या मरणाचें दुःख मला थोडेंच किंवा मुळींच वाटलें नसतें. कारण, माझ्या देखत अर्थात् पुष्कळ लोक मरत गेले असते, व त्यामुळें मला त्याचा कांहींच विधिनिषेध वाटला नसता. यास उदाहरण, कांहीं प्रकारचीं फुलझाडें आहेत, तीं एका वर्षानें मरतात; तथापि लोक तीं दर वर्षी पुनः पुनः आवडीनें आपल्या बागांत लावितात, व तीं मेल्याचें त्यांना कांहींच वाईट वाटत नाहीं.

'आम्हीं सर्व अमर लोकांनीं पाहिलेल्या व लिहून ठेवलेल्या गोष्टी वेळोवेळीं एकमेकांस कळविल्या असत्या, व कोणकोणत्या प्रकारें जगामध्यें नीतिभ्रष्टतेचा प्रवेश होतो त्याकडे लक्ष पुरविलें असतें; व मनुष्यमात्राची पदोपदीं कानउघाडणी करून, व त्यांस उपदेशाच्या गोष्टी सांगून ती बंद करण्याचा यत्न केला असता. या गोष्टींच्या योगानें, व आमचे स्वतःचे सद्वर्तनाचें उदाहरण ढळढळीत लोकांच्या नजरेस पडत गेल्यानें, जगांत नेहमीं जो भ्रष्टाकाराचा बोभाटा ऐकूं येतो तो समूळ नाहींसा झाला असता.

'याखेरीज, लहानमोठ्या राष्ट्रांत ज्या राज्यक्रांति होतात, त्या सर्व मला पहाण्यास सांपडल्या असत्या; स्वर्गलोक व मृत्युलोक यांत होणारे अनेक फेरफार मला समजून आले असते; मोठमोठीं पुरातन शहरें धुळीस मिळून भिकार गांवें राजधानीच्या योग्यतेस आलेलीं, मोठमोठ्या नद्यांचे ओढे झालेले, समुद्राची एक बाजू कोरडी पडत जाऊन दुसरीकडे तो पसरत चाललेला, अनेक अज्ञात देशांचा शोध लागलेला, मोठमोठीं सुधारलेलीं राष्ट्रं अगदीं रानटी झालेलीं, व रानटी देश सुधारणुकेच्या शिखरास पोहोंचलेले, असे माझ्या दृष्टीस पडले असते; व यामुळें मला परमावधीचा आनंद झाला असता.

'आम्हीं अमर लोकांनीं केलेलीं भविष्यें खरीं झालेलीं आह्मांस पहाण्यास सांपडल्याकारणानें, धूमकेतूची गति व त्याचा पुनः उदय, तसेंच सूर्य, चंद्र व तारे ह्यांच्या गतींतील फेरफार आमच्या अवलोकनांत येऊन आह्मांस ज्योतिषशास्त्रांत अनेक प्रकारचे शोध करण्यास सांपडले असते.'

ह्याखेरीज, अनंतकाळ जीवित व ऐहिक सुख यांच्या स्वाभाविक इच्छेच्या योगानें मला आणखी शेंकडों गोष्टी सुचल्या, त्यांवरही मीं पुष्कळ संभाषण केलें. माझें बोलणें संपलें तेव्हां त्याचा गोषवारा भाषांतररूपानें त्या पूर्वीच्या गृहस्थानें सर्व मंडळीस सांगितला. तेव्हां ते लोक आपल्या भाषेंत आपापसांत बराच वेळपर्यंत बोलत होते, व माझ्या अज्ञानाच्या संबंधानें मधून मधून त्यांना हंसूंही येत असे. शेवटीं तो दुभाषी गृहस्थ मला म्हणाला, 'कांहीं गोष्टींच्या संबंधानें तुमचे जे गैरसमज झालेले आहेत ते नाहींतसे करावे असें ही मंडळी मला सांगत आहे. आतां याबद्दल तुम्हांला फारसा दोष देतां येणार नाहीं हें उघड

आहे; कारण मनुष्यमात्राच्या स्वभावदुर्बलत्वाचा हा गुणच आहे. असो; हे अमर लोक फक्त आमच्या देशांत निपजतात; कारण बाल्निबार्बी व जपान ह्या देशांत परराज्यसंबंधी वकील या नात्यानें मला पुष्कळ वेळां जाण्याचा प्रसंग आला होता, त्या वेळीं तेथें अशा प्रकारचे लोक माझ्या कधींही पहाण्यांत आले नाहींत; इतकेंच नव्हे, तर त्या देशांतील लोकांचा या गोष्टीवर विश्वास देखील पटत नाहीं. ते म्हणतात कीं, हें अगदीं असंभवनीय आहे. आणि मीं जेव्हां ही गोष्ट तुह्मांस पहिल्यानें सांगितली, तेव्हां तुह्मांला मोठें आश्चर्य वाटलें, यावरून तुम्हांसही ती केवळ नवीन व अविश्वसनीय अशी वाटली, नाहीं बरें ? असो, मी या वरील दोन ठिकाणीं असतां पुष्कळ लोकांशीं संभाषण करण्याचा मला प्रसंग आला होता, तेव्हां, त्या सर्वांची इच्छा आपण पुष्कळ दिवस वांचावें, अशी दिसून आली. ज्या मनुष्याचीं लांकडें देखील स्मशानांत गेलीं आहेत, तोही जगण्याची खटपट होईल तितकी करीतच असतो. मनुष्य अगदीं नाकीं सूत धरलेला असला, तथापि आणखी एक दिवस तरी आपण वांचावें असें त्यास वाटत असतें. मृत्युलोक हा मनुष्यास कधींना कधीं सोडावा लागतोच, यास्तव तो अत्यंत दुःखद आहे असें त्याचें म्हणणें असतें. परंतु आमच्या ह्या लग्नाग् बेटांतील लोकांस मात्र फार दिवस वांचण्याची इच्छा नसते; कारण येथील अमर लोकांचीं उदाहरणें नेहमीं त्यांच्या दृष्टीसमोर असतात.

‘ तुम्हीं आयुष्यक्रमाचा जो मार्ग सांगितला तो अगदीं असमंजसपणाचा व चुकीचा आहे. तुम्ही प्रथम असें गृहीत घेतां कीं, एक तुम्ही अमर झालां कीं तुमचे अंगीं

तारुण्य, शक्ति व जोम हीं नेहमीं रहावयाचींच परंतु मनुष्याच्या इच्छा कितीही अमर्याद असल्या, तरी त्यानें इतक्या गोष्टी प्राप्त होण्याविषयीं इच्छा करणें हा शुद्ध मूर्खपणा आहे! मनुष्य हा तारुण्य, संपत्ति, संतति, इत्यादिकांनीं युक्त राहून अमरत्व पतकरील किंवा नाहीं हा मुळीं प्रश्नच नाहीं; तर त्याला अमरत्व प्राप्त झालें, तथापि नेहमींप्रमाणें सुखदुःख व जराव्याधि ह्या त्याला सुटावयाच्या नाहींत, अशा अटीवर तो अमर झाल्यास कशा रीतीनें वागेल, एवढ्याच गोष्टीचा काय तो विचार करावयाचा आहे; व मला वाटतें, अशा अटीवर कोणीही अमर होऊं इच्छिणार नाहीं. तथापि पूर्वी सांगितलेल्या म्हणजे जपान व बाल्निबार्बी या देशांत लोकाची अशी स्थिति आढळते कीं, मरण कितीही उशीरां आलें तरी तें थोडा वेळ लांबलें असतें तर बरें होतें, असें म्हणणारे लोक असतातच. फक्त दुःख व वेदना यांच्यामुळें ज्यांना आपल्या जिवाचा त्रास आलेला असतो, ते मात्र मरण केव्हां येईल याची वाट पहात असतात. तसें नको, तुम्ही ज्या देशांत फिरलां तेथें व तुमच्या स्वतःच्या देशांत, मी म्हणतों अशी स्थिति आहे कीं नाहीं तें तुम्हींच सांगा बरें?'

अशा रीतीनें प्रस्ताव करून तो त्या अमर लोकांची कच्ची हकीकत मला सांगूं लागला. तो म्हणाला, 'हे अमर लोक सुमारें तीस वर्षेपर्यंत इतर नाशवंत प्राण्यांप्रमाणेंच असतात. नंतर दिवसेंदिवस ते अगदीं उदास व खिन्न होत जातात. असें त्यांची ऐशीं वर्षांची उमर होईपर्यंत चालतें. ही गोष्ट तरी त्यांच्या स्वतःच्याच सांगण्यावरून मला माहीत झाली. नाहींपेक्षां असले लोक एका शतकांत

फार तर दोन तीन निपजणार, तेव्हां त्यांच्या संबंधानें साधारण नियम काढण्याला आमच्यापैकीं इतके दिवस वांचणारा क्वचितच. या देशांतील मनुष्यांची आयुष्यमर्यादा ऐशीं वर्षांपर्यंत असते असें अनुमान केलेलें आहे; व हे अमर लोक जेव्हां ऐशीं वर्षांचे होतात, तेव्हां त्यांचे अंगीही वार्धक्याचे योगानें प्राप्त होणारें वैगुण्य—ह्मणजे बुद्धिभ्रंश, अंगवैकल्य इत्यादि येतात; व या यातनांतून सुटण्याचें साधन जें मरण त्यालाही आपण मुकलों ही गोष्ट त्यांच्या मनांत येऊन त्यांची अशी दशा होते कीं, तिचें वर्णन देखील करितां येणार नाहीं! दुराग्रह, तुसडेपणा, लोभ, घुमेपणा, गर्व व वाचाळपंचविशी हे सर्व दुर्गुण त्यांच्या अंगीं येतात; इतकेंच नव्हे, तर मित्रत्वासही ते अयोग्य होतात. त्यांना नातवंडें होत तोंपर्यंत त्यांच्या अंगीं ममता कांहीं असते, पण पुढें ती त्यांच्या कशी ती स्वप्नींही नसते. त्यांच्या ठायीं मत्सरभाव फारच प्रबळ होतो; व ज्या गोष्टींचा उपभोग घेण्याची त्यांच्या अंगीं शक्ति नसते, त्या प्राप्त होण्याविषयीं त्यांना फारच हाव सुटते. मुख्यत्वेंकरून तरुण व वृद्ध लोकांविषयीं त्यांना फार मत्सर उत्पन्न होतो; ह्मणजे तारुण्याच्या भरांत लोक जो दुराचार करितात तो त्यांना करावासा वाटतो, पण तो करण्याला त्यांच्या अंगीं सामर्थ्य नसतें. तसेंच वृद्ध मनुष्यांच्या संबंधानें त्यांना असें वाटत असतें कीं, हे आतां इहलोकच्या यातनांतून सुटून परलोकीं विश्रांतीस जाणार, आणि आपण तर येथेंच सर्वकाळ लोळत पडणार! तेव्हां या गोष्टीबद्दल त्यांना परमावधीचें दुःख व खंती वाटते. ते आपल्या बाल्यावस्थेंत व तारुण्यावस्थेंत जें कांहीं करितात व शिकतात, त्याचें मात्र त्यांना स्मरण असतें; परंतु तेंही

फारच थोडें असतें. यामुळें एखाद्या गोष्टीची खरी किंवा तपशीलवार माहिती पाहिजे असल्यास त्या लोकांस विचारण्यापेक्षां परंपरा चालत आलेल्या दंतकथेवरच भरंवसा ठेवणें चांगलें. ह्या लोकांपैकीं ज्यांना म्हातारचळ लागतो, व ज्यांची स्मरणशक्ति अगदीं नाहींशी होते, त्यांची स्थिति कांहीं तरी बरी ह्मणावयाची; कारण, अशा मनुष्यांचे अंगीं इतरांपेक्षां दुर्गुण कमी असतात; व यामुळें लोकांस त्यांची कींव येऊन ते त्यांस साहाय्य करितात.

'जर एकाद्या अमर पुरुषाचें तसल्याच प्रकारच्या स्त्रीशीं लग्न झालें, तर त्यांपैकीं वयानें लहान असणाऱ्यास ऐशीं वर्षें पुरीं झालीं कीं तें लग्न रद्द करावें, असा येथील सरकारानें कायदा केलेला आहे. त्या कायद्याचें असें मत आहे कीं, ज्या प्राण्यानें स्वतः मुळींच अपराध केला नसून ईश्वराकडूनच ज्यास ह्या लोकीं अनंत काळ वास करण्याची शिक्षा झालेली आहे, त्याच्या पाठीमागें आणखी बायकोचें लोढणें ठेवून त्याचें दुःख द्विगुणित करणें हें योग्य नाहीं.

'त्यांची उमर पुरी ऐशीं वर्षांची झाली कीं ते कायद्याच्या मतानें मेल्यासारखेच होतात, व त्यांचे वारस लागलेच त्यांच्या मालमत्तेचा ताबा घेतात, आणि त्यांस थोडीबहुत शेरटिपरीची नेमणूक करून देतात. परंतु जे गरीब असतात, त्यांचा खर्च सरकारच्या तिजोरींतून चालतो. वरील मुदतीपुढें त्यांच्यावर पैशाचें किंवा दुसरें कोणतेंही विश्वासाचें काम सोंपवीत नाहींत. तसेंच त्यांना जमीन वगैरे विकत घेण्याचा अथवा करारनामे करण्याचा अधिकार रहात नाहीं. त्यांची साक्ष दिवाणी किंवा फौजदारी खटल्यांत

चालत नाहींच, परंतु एकाद्या हलक्यासलक्या कामांतही त्यांचा पुरावा घेत नाहींत.

‘ ते नव्वद वर्षांचे झाले कीं त्यांचे दांत पडतात, व केंसही गळतात. ह्या वयांत त्यांच्या तोंडास मुळींच चव नसते; यामुळें खाण्यापिण्यास त्यांस जें कांहीं मिळतें त्याची चवढव कांहींएक न पहातां ते नुसती पोटाची भर करितात. त्यांच्या अंगीं जे रोग जडलेले असतात, ते तसेच राहतात—त्यांत कांहींएक कमी जास्त होत नाहीं. बोलण्याच्या संबंधानें ह्मणाल तर, साधारण वस्तूंचें किंवा मनुष्याचें नांवही त्यांच्या ध्यानांत रहात नाहीं—मग तो मनुष्य त्यांचा अगदीं जिवलग मित्र असो, अथवा अगदीं जवळचा नातेवाईक असो—व ह्याच कारणासाठीं संभाषणाच्या व ग्रंथावलोकनाच्या योगानें त्यास आपलें मनोरंजन करतां येत नाहीं; कारण वाक्याच्या आरंभापासून तों शेवटापर्यंत त्याचा अर्थ ग्रहण करण्याइतकी त्यांना आकलनशक्ति रहात नाहीं. यामुळें वृद्धापकाळीं समाधानाचें साधन जें संभाषण व ग्रंथावलोकन, त्याचेंही सुख त्यांस मिळत नाहीं.

‘ आमच्या भाषेंत नेहमीं फेरबदल होत असल्यामुळें एका काळच्या अमर मनुष्यास दुसऱ्या काळच्या अमर मनुष्याची भाषा मुळींच समजत नाहीं; व दोनशें वर्षें झालीं ह्मणजे त्यांस आपले शेजारीपाजारी जे नाशवंत लोक त्यांच्याशींही बोलतां येत नाहीं—कदाचित् एकादादुसरा शब्द आला तर आला. अशा प्रकारें आपल्याच देशांत परस्थांप्रमाणें त्यांना रहावें लागतें.’

याप्रमाणें मला त्या अमर लोकांची एकंदर हकीकत त्या गृहस्थानें सांगितली; निदान मला तरी ती इतकीच स्मरते.

नंतर मीं पांच सहा अमर लोक पाहिले. ते सर्व निरनिराळ्या काळीं जन्मलेले होते. त्यांपैकीं सर्वांत धाकटा मनुष्य दोनशें वर्षांचा होता. माझे मित्र मला हे लोक



'अमर लोक.' (पृ. १०५.)

वेळोवेळीं दाखवीत, व त्यांना आमच्या मंडळीनें जरी सांगितलें कीं, हा गृहस्थ जबरदस्त देशाटन करणारा आहे व यानें सर्व पृथ्वी पाहिली आहे, तरी त्यांनीं मला त्या संबंधानें एक अक्षरही विचारिलें नाहीं. ते फक्त इतकेंच ह्मणाले कीं, 'आपली आह्मांस आठवण रहाण्याकरितां आपण आपली कांहीं तरी खूण आम्हांला देऊन जाल तर

बरें होईल. ' असें म्हणण्याचें कारण, त्यांस उघड उघड भिक्षा मागण्याची कायद्यानें मनाई आहे; कां कीं त्यांचा चरितार्थ सरकारच्या तिजोरींतून चालतो. तथापि त्यांची नेमणूक अगदीं थोडी असते, ह्मणून ते वरील युक्तीनें कांहीं अधिक मिळवूं पहातात.

त्यांना इतर सर्व लोक कस्पटाप्रमाणें मानतात, व त्यांचा पराकाष्ठेचा तिरस्कार करितात. जेव्हां एकादा अमर मनुष्य जन्मतो, तेव्हां हा मोठा अपशकुन आहे असें ते लोक समजतात; व दाखल्याकरितां त्याचा जन्मकाळ मोठ्या काळजीनें टिपून ठेवितात. हे दाखले एक हजाराहून अधिक वर्षांचे मिळत नाहींत. त्या संबंधाचे कागदपत्र फार जुने झाल्याकारणानें फाटून तुटून गेले असावे, किंवा दंग्याधोप्यांत गहाळ झाले असावे. परंतु त्यांचें वय काढण्याची साधारण रीत अशी आहे कीं, त्यांनीं कोणकोणते राजे अगर मोठमोठाले लोक पाहिले हें त्यांस विचारावें, आणि त्या लोकांचे सन इतिहासांत पाहून काढावे ह्मणजे त्यांचें वय सहज समजतें. कारण शेवटच्या ज्या राजाचें नांव त्यांना आठवत असेल, तो त्यांचें ऐशीं वर्षांचें वय झाल्यावर गादीवर बसला नसेल हें सांगावयास नकोच.

ते लोक अतिशय हिडिस दिसतात. त्यांत बायका तर शुद्ध राक्षसिणीच भासतात. म्हातारपणीं मनुष्याच्या शरिरास जी कुरूपता येते, ती ह्या अमर लोकांस येत असून त्यापेक्षांही जास्त असा कांहीं त्यांच्या शरिराचा आकार होतो कीं, त्याचें वर्णनच करितां येत नाहीं ! त्यांचें वय जों जों अधिक होत जातें तों तों हा वरील प्रकार वृद्धिंगतच होत जातो; तो इतका कीं, जरी त्यांच्या-

मध्यें वयाचा फरक शंभर दोनशें वर्षांपेक्षां अधिक नसतो, तरी त्यांच्यापैकीं पांच सहा जण जे मीं पाहिले, तेवढ्यांतच इतरांपेक्षां जास्त वयाचा कोण, हें मला तेव्हांच समजून आलें.

ह्या लोकांची मीं जी हकीकत ऐकली, व स्वतः जी त्यांची स्थिति पाहिली, तिजवरून माझी अमर होण्याची इच्छा अगदीं नाहींशी झाली हें वाचकांस सांगावयास नकोच. मीं जे मनांत मांडे खाल्ले होते, त्यांविषयीं मला आतां फारच लज्जा वाटूं लागली. मरणसमयीं कितीही हाल झाले तरी ते पुरवले, पण वरील स्थितींत जिवंत रहाणें फारच वाईट, अशी माझी पक्की खात्री झाली. माझा व त्या एकंदर मंडळीचा जो संवाद झाला, तो राजाच्या कानावर गेला तेव्हां त्यानें माझी बरीच थट्टा केली. तो म्हणाला, ‘ या अमर लोकांपैकीं दोन इसम तुमच्या देशांत पाठविल्यास तुमच्या लोकांस मृत्यूविषयीं जी एवढी भीति वाटते ती अगदीं नाहींशी होईल. पण काय करावें ! आमच्या देशाच्या कायद्यानें ही गोष्ट मना केली आहे. ’ आणि खरोखर, ही अडचण जर नसती, तर मीही त्यांस इकडे आणल्यावांचून राहतोंना. मग त्याकरितां कितीही खर्च व मेहनत पडती तरी चिंता नव्हती.

या अमर लोकांचे संबंधानें त्या देशचे जे कायदे आहेत ते फारच उत्तम आहेत असें म्हटल्यावांचून मला राहवत नाहीं; व दुसऱ्या कोणत्याही देशांतील लोकांनीं अशा बाबतींत याच प्रकारचे कायदे केले असते यांत संशय नाहीं. कारण हावरेपणा हा जो वार्धक्याचा स्वाभाविक परिणाम, तो या अमर लोकांच्या ठायीं फारच वाढून कांहीं काळांत हे सर्व राष्ट्राचे मालक झाले असते, व सर्व राज्या-

धिकार आपणच बळकावून बसले असते; आणि तो संभाळण्याचें सामर्थ्य त्यांचे अंगीं नसल्यामुळें, लोकांचें नुकसान होऊन त्यांना धुळीचे दिवे खात बसावें लागलें असतें!

---

## प्रकरण ११.

मागील प्रकरणांत अमर लोकांचा जो मीं वृत्तांत दिला आहे, तो कांहींसा एकदेशीय असल्यामुळें वाचकांस त्यापासून कांहीं करमणूक होईलसें वाटतें. निदान इतकें खरें कीं, मुशाफर लोकांचे जे वृत्तांत माझ्या वाचण्यांत आले आहेत, त्यांत तरी असली गोष्ट मला कोठेंही आढळली नाहीं. इतक्याही उपर ही माझी समजूत चुकीची ठरल्यास मला एक सबब सांगायाला आहे कीं, अनेक लोकांनीं एकाच देशाचें वर्णन केलें असतां त्यांच्या लिहिण्यांत त्याच त्या गोष्टी पुनः पुनः येणें हें साहजिकच आहे; आणि अशी गोष्ट झाली असतां, अमक्यानें अमक्याच्या ग्रंथांतील मजकूर चोरला असाही आरोप कोणीं कोणावर ठेविला असतां तो रास्त दिसणार नाहीं.

लग्नाग् आणि जपान या दोन देशांमध्यें व्यापार फार मोठा चालतो. तेव्हां पूर्वीं सांगितलेल्या अमर लोकांविषयीं जपानांतील ग्रंथकारांनीं कांहीं हकीकत दिली असावी असें अनुमान होतें. परंतु जपान देशांत माझें फार थोडे दिवस रहाणें झाल्यामुळें, व तेथील भाषाही मला मुळींच अवगत नसल्यामुळें, त्या संबंधानें माहिती मिळविण्यास मला मुळींच मार्ग नव्हता. पण हा माझा लेख पाहिल्यावर डच लोक हे सदहू गोष्टीबद्दल चौकशी करून माझ्या ग्रंथांतील ही वरील उणीव काढून टाकतील अशी मला उमेद आहे.

लग्नाग्चे राजानें मला आपले दरबारीं एकाद्या हुद्या-

वर रहाण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला. परंतु माझा स्व-देशीं जाण्याचा पक्का निश्चय झालेला पाहून त्यानें मेहेर-नजरेनें मला जाण्याकरितां परवाना दिला; व मजकरितां स्वदस्तूरचें एक शिफारशीचें पत्रही जपानचे बादशाहास दिलें. त्याचप्रमाणें त्यानें मला ४४४ मोहोरा बक्षीस दिल्या. ( या लोकांस समसंख्येची फार आवड असते. ) याखे-रीज राजानें आणखी मला एक उत्तम प्रकारचा तांबड्या रंगाचा हिराही दिला. तो इंग्लंडास आल्यावर मीं अक-राशें पौंडांस विकून टाकिला.

सन १७०९ च्या मे महिन्याच्या ६ वे तारखेस राजा व आपले सर्व मित्र यांचा मी शेवटचा निरोप घेऊन नि-घालों. हा राजा फारच दयाळू यांत संशय नाहीं. कारण त्यानें मला ग्लेगेस्टल् बंदरीं पोहोंचविण्यास कांहीं शिपाई लोकही देण्याचा हुकूम केला. वरील बंदर लग्नाग् बेटाचे नैर्ऋत्येस आहे. तेथें पोहोंचल्यावर सहा दिवसांनीं जपानास जाण्यास मला जहाज मिळालें. जपान देशास पोहोंच-ण्यास आम्हांस सुमारें पंधरा दिवस लागले. आम्ही, झा-मोशी नांवाचें लहानसें बंदर आहे तेथें उतरलों. हें जपा-नच्या आग्नेय भागास असून पश्चिमाभिमुख वसलेलें आहे. त्या ठिकाणीं एक अरुंद खाडी उत्तरेकडे बरीच लांब गेलेली आहे. या खाडीच्या वायव्येस जपानची राजधानी यड्डो शहर हें आहे. मी उतरतांच, लग्नाग्च्या राजानें तेथील बादशाहास देण्याकरितां मला जें पत्र दिलें होतें, तें तेथील जकातीकडील कामगारांस मीं दाखविलें. त्याव-रचा शिक्का त्यांच्या ओळखीचाच होता. तो माझ्या तळ-हाताएवढा होता, व त्यावर, ‘ राजा एका लंगड्या भिका-ऱ्याला हातांत धरून उठवीत आहे ’ अशा अर्थाचीं अक्षरें

होतीं. त्या ठिकाणच्या कामगार लोकांनीं, बादशाहास मीं लग्नागच्या राजाचें पत्र आणिलें आहे असें ऐकून, एकाद्या राजाच्या प्रधानाप्रमाणें माझा आदरसत्कार केला. त्यांनीं मला गाड्या, घोडीं व चाकरमाणसें दिलीं; व मला यड्डो येथें जाण्याचा सर्व खर्चही दिला. तेथें मी पोहोंचतांच बादशाहाच्या दरबारीं गेलों, व सदहू पत्र त्यास दिलें. तें मोठ्या समारंभानें त्यानें फोडिलें, व त्यांतील मजकूर एका दुभाष्यानें त्यास समजावून दिला. त्या गृहस्थानें बादशाहाच्या आज्ञेवरून मला सांगितलें कीं, 'तुम्हांस सरकारांजवळ जी काय विनंती करावयाची असेल ती करा; व ती कशीही असली तरी, त्यांचे भाई जे लग्नागचे राजे, त्याच्याकरितां ती मान्य केली जाईल.' हा दुभाषी गृहस्थ डच लोकांच्या संबंधाचें कामकाज पहाण्यास नेमिलेला होता. त्यानें माझ्या चर्येवरून ताडलें कीं, हा कोणी युरोपियन असावा. सबब त्यानें डच भाषेंत मला राजाचा हुकूम सांगितला. ती त्याला चांगली बोलतां येत असे. मीं आपल्या पूर्वीच्या संकेताप्रमाणें त्यास सांगितलें कीं, 'मी हॉलंड देशचा व्यापारी असून एका फार दूरच्या देशानजीक माझें जहाज फुटल्यामुळें मी तेथून खुषकीनें व जलमार्गानें प्रवास करीत करीत लग्नाग् येथें आलों, व या देशांत माझ्या देशचे व्यापारी लोक येतात, हें मला माहीत असल्याकारणानें त्यांच्यांपैकीं एकाद्याबरोबर मला युरोपखंडांस परत जातां येईल असें वाटल्यावरून मी येथें आलों आहें. यास्तव सरकारचे पायांजवळ माझी येवढीच प्रार्थना आहे कीं, नागासाकी येथें मला सुरक्षितपणें पोहोंचविण्याविषयीं हुकूम व्हावा; व आणखी माझी अशी विनंती आहे कीं, क्रुसावर पाय देण्याचा विधि करण्याविषयीं जी अट माझ्या

देशबंधूंवर घातलेली आहे ती मला लागू करूं नये; कारण, मी या देशांत केवळ संकटामुळें आलों आहे; कांहीं व्यापाराचे उद्देशानें आलों नाहीं.' ही माझी दुसरी विनंती जेव्हां त्या दुभाष्यानें बादशाहास समजाविली, तेव्हां त्याला थोडें नवल वाटलेंसें दिसलें. या संबंधानें तो मला म्हणाला, ' या गोष्टीबद्दल मनांत शंका आणणारा तुमच्या देशबांधवांत दुसरा कोणीही आजपर्यंत मला आढळला नाहीं; व यावरून तुह्मी हॉलंड देशांत रहाणारे आहां किंवा नाहीं या गोष्टीचा मला संशय वाटतो; व कदाचित् तुम्ही ख्रिस्ती असाल अशी माझ्या मनांत कल्पना येते.* तें कसेंही असो, तुह्मीं सांगितलेलीं कारणें ध्यानीं आणून, व लग्लाग्चे राजे जे आमचे भाई त्यांच्या संतोषास्तव तुमचें हें तऱ्हेवाईक ह्मणणें मी कबूल करितों. पण ही गोष्ट तुह्मीं मोठ्या युक्तीनें केली पाहिजे, व जणू काय तुह्मी विसरभोळेपणानें तसेच गेलां, अशी सफाई करण्याविषयीं आम्हांस आमच्या कामगार लोकांस सांगून ठेविलें पाहिजे. कारण, जर का ही गोष्ट तुमचे देशबंधु डच लोक यांस कळली, तर ते तुमच्या नरड्याचा घोंटच घेतील!' ह्या येवढ्या मोठ्या मेहेरबानीबद्दल मीं त्या दुभाष्याच्या द्वारें बादशाहास आपले आभार प्रदर्शित केले; व त्याच वेळीं, नागासाकी येथें कांहीं पलटणी रवाना होणार होत्या,

---

* जपानांत आपल्याखेरीज इतर कोणत्याही देशांतील लोकांचा प्रवेश होऊं नये, म्हणून डच व्यापाऱ्यांनी जपानी लोकांच्या नाहीं नाहीं तसल्या अटी कबूल केल्या होत्या, याबद्दल ग्रंथकारानें त्यांस हा टोला दिला आहे. डच लोकांना जपान देशांत पाऊल टाकण्यापूर्वी, ' आम्ही ख्रिस्ती नाहीं ' असें म्हणावें लागत असे, व क्रूस—जो ख्रिस्ती लोकांस पूज्य—त्यावर पाय द्यावा लागत असे असें म्हणतात.

त्यांजवरील अधिकाऱ्यास मला सदहू बंदरीं सुरक्षितपणें पोहोंचवून देण्याविषयीं बादशाहानें हुकूम केला.

सन १७०९ च्या जून महिन्याच्या ९ व्या तारखेस मी नागासाकी येथें येऊन दाखल झालों. हा प्रवास फार दिवस लांबला, व यांत मला फारच त्रास सोसावा लागला. वरील ठिकाणीं पोहोंचल्यावर, तेथें आमस्तेर्डम् नांवाचें जहाज आलेलें होतें, त्यावरील खलाशांशीं माझा लवकरच स्नेह जडला. मी हॉलंड देशांत लेडेन येथें अभ्यासाकरितां पुष्कळ दिवस राहिलों होतों, व मला डच भाषा चांगली येत होती. त्या खलाशी लोकांना मी शेवटीं कोणत्या ठिकाणाहून आलों होतों हें लवकरच समजलें. त्यावरून, तुमच्या प्रवासाची हकीकत व तुमचा नेहमींचा धंदा वगैरे कोणता हें आह्मांस सांगा, असें ते ह्मणाले. तेव्हां माझी जी खरी हकीकत होती ती बहुतेक गाळून टाकून मला एक लहानशी व संभवनीय अशी गोष्ट बनवून त्यांना सांगावी लागली. हॉलंडामध्यें माझा पुष्कळ लोकांशीं परिचय होता, त्यामुळें मला आईबापाचें नांव वगैरे बनविण्यास कांहींच अडचण पडली नाहीं. मीं त्यांस सांगितलें कीं, आम्ही ग्वेल्डरलंड नामक प्रांतांत रहाणारे असून अगदीं अप्रसिद्ध आहों. गलबताच्या नोराबद्दल कप्तानानें जी रक्कम मागितली असती ती मीं दिली असती, पण मी शस्त्रवैद्य आहें असें जाणून त्यानें खुषीनें मजपासून निम्मे गकार घेतला. मात्र तो ह्मणाला, 'तुह्मी शस्त्रवैद्य आहां अर्थी त्या नात्यानें तुम्ही माझ्या उपयोगीं पडलें पाजे.' आह्मीं जहाजांत बसण्याचे पूर्वी कांहीं खलाशांनीं ळा विचारलें कीं, 'तुह्मीं क्रूसावर पाय देण्याचा विधि ला काय?' मीं आपलें मोघम उत्तर दिलें कीं, 'बाद-

शाहा व दरबारची मंडळी यांच्यापाशीं मीं सर्व गोष्टींचा निकाल करून टाकला आहे.' तथापि जहाजावर एक लुच्चा खुनशी मनुष्य होता तो एका कामगाराकडे जाऊन ह्मणाला, ' ह्या मनुष्यानें अजून क्रुसाचा विधि केला नाहीं.' परंतु ज्या अधिकाऱ्यास मला तसेंच जाऊं देण्याविषयीं बादशाहानें सांगून ठेविलें होतें, त्यानें त्या काफर मनुष्याच्या पाठींत चांगल्या वीसपंचवीस काठ्या लगावल्या; तेव्हांपासून अगदीं हाण कीं बिगार–त्या गोष्टीचें नांव कोणी काढील तर शपथ !

ह्या प्रवासांत विशेष कांहीं सांगण्यासारखी गोष्ट घडली नाहीं. आह्मांस केप ऑफ् गुडहोपर्यंत चांगला वारा लागला. तेथें आमच्या जवळचें गोडें पाणी संपलें होतें तें घेण्याकरितां आम्ही उतरलों. नंतर आम्ही सन १७१० च्या एप्रिल महिन्याच्या १० व्या तारखेस आमस्तेर्डम् येथें येऊन पोहोंचलों. आमच्या खलाशांपैकीं तीनजण आजारी पडून मेले; व एकजण गिनी देशाच्या किनाऱ्याजवळ गलबताच्या नाळीवरून समुद्रांत पडून मेला. आमस्तेर्डम् येथून तेथल्याच एका जहाजांत बसून मी इंग्लंडास यावयास निघालों.

आम्ही एप्रिल महिन्याच्या १६ व्या तारखेस डाउन्स खाडींत येऊन दाखल झालों. दुसरे दिवशीं मीं जहाजांतून उतरून पुनः एकवार आपल्या जन्मभूमीवर पाय ठेविला. मी ह्या सफरीस निघाल्यापासून बरोबर साडेपांच वर्षांनीं परत स्वदेशीं आलों. मी लागलाच तडक रेड्रिफ् येथें यावयास निघालों, तों दुपारचे दोन वाजतां घरीं येऊन पोहोंचलों; आणि आपली बायको व सर्व मुलेंबाळें सुखरूप अशीं फिरून एकवार डोळे भरून पाहिलीं.

---